एक उत्तम संशोधक, उत्तम लेखक आणि त्यापेक्षाही

एक उत्तम मित्र,

श्री. जी. वेंकटसुब्बया

यांना सादर

# अनुक्रमणिका

# प्राक्कथन

साहित्य अकादमीसाठी वेमना या कवीवर प्रबंध लिहिण्याचं कबूल केल्यानंतर माझ्या लक्षात आलं, की हे काम बरंच अवघड आहे आणि माझी ही भीती खरी ठरली. वेमनासंबंधी थोडी चरित्रविषयक माहिती, काही आधारग्रंथ उपलब्ध असले, तरी त्यांपैकी बहुसंख्य ग्रंथांत केवळ अद्भूत आख्यायिकांची व दंतकथांची मांडणी इतिहासात सिद्ध झालेल्या घटनांच्या स्वरूपात करण्यात आली आहे हे आता पुराव्यानिशी सिद्ध झालं आहे, हे मनाला खटकतं. तेलुगु भाषेत फक्त एकच ग्रंथ (इंग्रजीत किंवा इतर भाषांत तर एकही नाही) उपलब्ध आहे. पण तोही समाधानकारक नाही. आपल्या निष्कर्षांना उपयुक्त ठरतील तेवढ्याच वास्तव घटना व पुरावे या ग्रंथकारानं गोळा केले आहेत. शिवाय इतरही काही दोष आहेत. वेमनावरील संदर्भग्रंथांच्या यादीत गेल्या पिढीतील एक प्रख्यात लेखक चिलकमर्ती लक्ष्मीनरसिंहम यांच्या पुस्तकाचाही समावेश केला आहे. पण तो काही ग्रंथ नाही, तर दंतकथांवर आधारलेल्या त्याच्या बृहत्कथेतलं एक प्रकरण आहे आणि तेही अद्‌भुत आख्यायिकांनी व दंतकथांनी भरलेलं आहे. पण ते शोधून काढण्यात माझा बराच काळ व्यर्थ गेला. दुसऱ्या एका बाबतीतदेखील ह्या लेखकानं मला असेच कष्ट घ्यावयास लावले. या पुस्तकात, ‘ मॅकलीन ’ या ग्रंथकाराचा त्यानं उल्लेख केला आहे. बरेच महिने तपास केल्यावर असं आढळून आलं की, ऐकीव माहितीवर विसंबून ज्याचा त्यानं ‘ मॅकलीन ’ असा उल्लेख केला आहे, त्या लेखकाचं खरं नाव मेजर आर. एम्. मॅकडोनल्ड असं असून, त्यानं सन १८६६ साली एक लहानसा निबंध वेमनावर प्रसिद्ध केला होता.

स्वतःला इतिहासकार मानणाऱ्या दुसऱ्या एका तेलुगु लेखकानंही माझी अशीच दिशाभूल केली. काही महिन्यांपूर्वी प्रसिद्ध केलेल्या चोपड्यात त्यानं असं म्हटलं आहे, की सर विलियम जोन्स यांनी ‘ भारताचा प्लेटो ’ अशा शब्दात वेमनाचं वर्णन केलं आहे. नवी दिल्ली येथील पार्लमेन्टच्या ग्रंथालयात, या संदर्भासाठी जोन्सची संपूर्ण ग्रंथावली धुंडाळण्यात मी एक आठवडा घालवला. या ग्रंथावलीला सूची न जोडण्याची अश्लाघ्य चूक घडल्यामुळं मला हे श्रम करावे लागले. पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. मग कलकत्त्याच्या नॅशनल लायब्ररीकडं आणि त्याच

शहरातल्या एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथालयाकडं पत्रानं चौकशी केली. तेव्हा त्यांच्या उत्तरांवरून हे स्पष्ट झालं, की सर विलियम जोन्सचे ते उद्गार वेमनाला उद्देशून नव्हते, तर महर्षी व्यासाला अनुलक्षून होते.

अशा प्रकारे तेलुगु आधारग्रंथाची गुणवत्ता किती कमी प्रतीची आहे, ते कसे अविश्वसनीय आहेत, हे उघड होतं. फक्त श्री. रालापल्ली अनंतकृष्णा शर्मा यांच्या व्याख्यानांचा त्याला अपवाद करावा लागेल. ही व्याख्यानं चाळीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाली. त्यानंतर तेलुगु भाषेत उल्लेखनीय, महत्त्वाचं असं काही प्रसिद्ध झालं नाही. इंग्रजीत मात्र या काळात, वेमनाविषयी पुष्कळ चांगलं साहित्य प्रकाशित झालं आहे. परंतु ते सहजासहजी उपलब्ध होण्यासारखं नाही. उदाहरणार्थ, डॉ. सी. आर. रेड्डी यांचं एक इंग्रजी भाषण मद्रास आकाशवाणीवरून प्रसारित झालं आहे. पण ते ध्वनि-फितीच्या स्वरूपातच उपलब्ध आहे. यावरून मी काय म्हणतो, त्याची कल्पना येईल. परंतु मद्रास केंद्रावरील माझे मित्र श्री. दाशरथी यांच्या साहाय्यानं त्याची टंकलिखित प्रत मला मिळू शकली.

वेमनाविषयीची चरित्रविषयक माहिती गोळा केल्याबरोबर, लगेच मला असं दिसून आलं की, वादग्रस्त व परस्परविरोधी विधानांच्या जंगलांतून वाट काढणं हे पहिल्यापेक्षाही अधिक अवघड आणि कष्टाचं काम आहे. वेमनाच्या जीवन-चरित्राविषयी निश्चित स्वरूपाची काहीच माहिती उपलब्ध नाही आणि ती आता उपलब्ध होण्याची शक्यताही नाही, हे मोकळेपणानं मान्य करायला हवं. दुसरं, उपलब्ध माहितीदेखील विसंगत व परस्परविरोधी आहे. त्याच्या पद्याचं 'विश्वदा अभिरामा, विनुरा वेमा ' हे साधं ध्रुवपददेखील वादाचा विषय बनलं आहे. या एका ओळीचे निरनिराळ्या पंडितांनी वेगवेगळे विग्रह व विश्लेषण केलं असून, त्याचे आपल्या मताप्रमाणे वेगवेगळे, विविध अर्थ लावले आहेत. मी (या वादापासून दूर) वस्तुनिष्ठ व निःपक्षपाती राहाण्याचा कसोशीनं प्रयत्न केला आहे. तो किती साधला आहे, हे ठरविण्याचं काम मी माझ्या वाचकांवरच सोपवतो.

श्री. दाशरथी विषयीचं ऋण मी आधीच मान्य केलं आहे. त्यांच्याप्रमाणेच या प्रबंधासाठी सामुग्री एकत्र करण्याच्या कामात मला अनेकांचं साह्य लाभलं आहे. त्यांचेही आभार मला मानले पाहिजेत. ' वाणी 'चे सहसंपादक श्री. डी. आंजनेयुलु, 'यूसिस'चे श्री. बी. एस्. आर. कृष्णा आणि 'फ्रीडम प्रेस'चे मालक श्री. बालसुंदरम्, या मद्रासच्या तिन्ही मित्रांचे मला विशेष आभार मानले पाहिजेत. तसंच नुझ्झाविदचे विधानसभा सदस्य श्री. एम्. आर. अप्पाराव, बेटापालमच्या सरस्वती निकेतनचे श्री. ए. श्रीनिवासराव, हैद्राबादचे प्रा. एन्. वेंकटराव आणि घंटाशालाचे श्री. जी. व्ही. सुब्बय्या यांचाही मी आभारी आहे.

श्री. डी. आंजनेयुलु यांनी विलियम हावर्ड कँबेल यांच्या लेखाची टंकलिखित प्रत मिळवून दिली, एवढंच नव्हे तर माझ्या हस्तलिखिताची पहिली चार प्रकरणं वाचून कांही उपयुक्त सूचना केल्या, याबद्दल त्यांचा मी कृतज्ञ आहे.

त्याचप्रमाणे तिरूपतीचे श्री. रालापल्ली अनंतकृष्णा शर्मा आणि श्री. ए. जानकीराम या दोघांनी मला अशाच प्रकारे उपकृत केलं आहे. माझे मित्र आणि 'आंध्रज्योती' (विजयवाडा) मधले माझे सहकारी श्री. एन्. राममोहनराव यांनी-देखील लेखनाच्या प्रत्येक टप्प्यावर मला मदत केली आहे. आंध्रज्योतीतले माझे दुसरे सहकारी श्री. एम्. व्ही. सुब्बाराव यांनीही मला बरेच साह्य केलं आहे. या सर्व मित्रमंडळींचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतो.

सर्वांच्या शेवटी वेमनाविषयीची माझी कृतज्ञता मला व्यक्त करायला पाहिजे. 'आटावेलदी' या छंदाला वेमनानं आपल्या प्रतिभेनं व कलागुणांनी पूर्णतेला नेलं आहे. त्यांच्यापासून स्फूर्ती घेऊन त्याच वृत्तांत मी सहाशे पद्यं लिहिली आहेत. हे त्यांचं माझ्यावरचं मोठं ऋण आहे. हा प्रबंध लिहून त्यांच्या या ऋणातून अंशतः उतराई होण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

— व्ही. आर. नार्ला

# मृत्युंजय

' नाही जन्मलास तू, मरण्यासाठी ' — कीटस्

कुठल्याही कसोटीवर घासून पाहिलं, तरी वेमना हा एक थोर कवी आहे, हेच सिद्ध होतं. लोकप्रियतेच्या दृष्टीनं विचार केला, तर त्याची लोकप्रियता कोणत्याही प्राचीन, मध्ययुगीन अथवा आधुनिक तेलगु कवींपेक्षा अधिक होती, असं दिसून येईल. इतर कवी सोडून द्या, मधाळ वाणीच्या पोतन्नाची लोकप्रियतादेखील, त्याच्या तुलनेत पन्नास टक्केच भरेल. वेमना हा सामान्य जनांचा लाडका शाहीर आहे, आवडता राजकुमार आहे. लक्षावधी सामान्य माणसांशी तो त्यांच्याच बोलीत बोलतो आणि ते लोक त्याच्यापाशी आपली हृदयं मोकळी करतात. कठोर वाणीच्या त्याच्या चाबकाच्या फटकाऱ्यांनी ते प्रसंगी कळवळतील, पण त्याबरोबर त्यांना हेही जाणवेल की त्यामागचा त्याचा हेतू शुद्ध आहे आणि मग त्याच्यावर ते अधिकच प्रेम करू लागतील. कवी म्हणून जसं ते त्याच्यावर प्रेम करतात, तसंच एक तत्त्वज्ञ, संत म्हणूनही ते त्याच्याविषयी आदर बाळगतात; आणि आपला एखादा मुद्दा सिद्ध करताना, दुसऱ्याला एखादं सत्य पटवून देताना किंवा एखाद्या नीतिविचारांचं समर्थन करताना ते त्याच्या कवितेच्या ओळींचा घडोघडी हवाला देतील. ह्यामुळंच भारतीय भाषांच्या आणि साहित्याच्या अभ्यासासाठी आपलं जीवन सर्मपित करणाऱ्या एका पाश्चात्य संशोधकानं, जी. ए. ग्रियर्सन यांनी असे उद्गार काढले आहेत, " आजच्या तेलगु लेखकांत वेमना हा सर्वाधिक लोकप्रिय कवी आहे असं आढळून येतं आणि सध्या ह्या भाषेत प्रचलित असलेल्या वाक्प्रचारांत किंवा लोकोक्तींत एखादीच उक्ती अशी सापडेल, की जिचं जनकत्व या कवीशी जोडण्यात येत नाही."

आंध्र प्रदेशातील सामान्य स्त्री-पुरुषांपुरतीच वेमनाची लोकप्रियता मर्यादित नाही; शेजारच्या प्रदेशांतही ती जाऊन पोचली आहे. फार पूर्वीच्या काळी, तमीळ आणि कन्नड भाषांत त्याच्या कवितांचे अनुवाद झाले आहेत. ज्याचे अनुवाद इतर भाषेत झालेत, असा तो पहिला तेलगु कवी आहे असं जरी म्हणता आलं नाही, तरी अनेक भाषांतून अनुवादित झालेला तोच एक तेलुगु कवी आहे, हे मात्र खरं.

असं असलं तरी, चालू शतकाच्या दुसऱ्या दशकापर्यंत, कवी वेमना तेलुगु साहित्यक्षेत्रात अनुल्लेखनीय मानला गेला, दुर्लक्षित राहिला. तोंपर्यंत कोणाही

तेलुगु कवीनं, अभ्यासकानं, समीक्षकानं, अथवा वाङ्मयेतिहासकारानं वेमनाचा उल्लेख केला नाही – सहज ओझरता किंवा तिरस्कारानंदेखील कोणीही त्याच्या नावाचा कधी निर्देश केला नाही. गुरुजादा श्रीराममूर्ती आणि कंदुकुरी वीरेश लिंगम् या तेलुगु साहित्याच्या आद्य इतिहासकारांनादेखील त्याला आपल्या इतिहासाच्या पानांबाहेरच ठेवणं इष्ट, उचित वाटलं. सन १८९९ साली प्रथम प्रकाशित झालेला वीरेश लिंगम् याचा 'आंध्र कवुलु चरितम्' (तेलुगु कवींची चरित्रं) हा ग्रंथ श्रीराममूर्तीच्या ग्रंथापेक्षा मोठा व विस्तृत आहे. या ग्रंथांत, लहान-सहान व अप्रसिद्ध कवींनाही अनेक पृष्ठं दिली आहेत, परंतु वेमनाला त्यातून वगळण्यात आलं आहे. पुढं १९१७ साली, या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीत काही भर घालून त्याची पृष्ठसंख्या दोनशेवीसपर्यंत फुगविण्यात आली. तरीही वेमनाला त्यातून कटाक्षानं वगळण्यात आलं.

श्रीराममूर्ती अथवा वीरेश लिंगम् या दोघांच्याही पुष्कळ आधी, अधिक नक्की सांगायचं तर १८२९ साली कावली वेंकटरामस्वामी यानं, 'दक्षिणी कवींच्या चरित्र-रेखा' या नावाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला. 'भारतीय द्वीपकल्पाच्या निरनिराळ्या प्रांतांत होऊन गेलेल्या प्राचीन व अर्वाचीन कवींची, अस्सल कागदपत्रांच्या आधारानं रचलेली चरित्रं आणि आठवणी' असं स्वतः ग्रंथकारानंच या ग्रंथाचं वर्णन केलं आहे. योगायोगानं भारतीय लेखकानं इंग्रजीतून लिहिलेल्या अगदी पहिल्यावहिल्या ग्रंथांपैकी हा एक ग्रंथ आहे. हा लेखक तेलुगु कवींचा पक्षपाती आहे. त्यात एकूण १०८ कवींचा समावेश आहे. त्यांपैकी ४७ तेलुगु कवी आहेत. मात्र या सत्तेचाळीसांतही वेमनाचा अंतर्भाव नाही.

वेमनाची भाषा आर्ष असती, त्याची शैली जड असती किंवा त्याचा विचार जुना, मागासलेला असता, तर काही कारण न देता, त्याला वगळण्यामागचं गूढ समजू शकलं असतं. परंतु वस्तुस्थिती अगदी उलटी आहे. त्याची भाषा शुद्ध, नेटकी आहे. त्याची शैली नितळ, पारदर्शी आणि मृदु-मवाळ आहे. त्याच्या काव्यात दर्शविलेले साम्य-विरोध ताजे, टवटवीत, निर्भय आणि सत्य असतात. विजेच्या चमकाऱ्यासारखे ते प्रकाशतात आणि आपल्या झळाळीने सर्व क्षितिज उजळून टाकतात. काही बाबतीतले त्याचे विचार केवळ त्याच्या काळाच्याच पुढे नाही, तर आधुनिक युगाच्याही पुढं गेलेले आहेत. सर्व खऱ्या व महान कवितेप्रमाणे वेमनाच्या काव्यातही मौलिक व सूक्ष्म अंतर्दृष्टी आहे. तिची अवतरणक्षमताही मोठी आहे. किंग जेम्सचे बायबल आणि शेक्सपिअर या दोघांनी इंग्रजी भाषेला हजारो वाक्प्रचार व म्हणी पुरवून, समृद्ध केलं आहे. तेलुगु भाषाही वेमनाची तितकीच ऋणाईत आहे. त्यानं तिला एक नवी धार, नवी शक्ती, एक नवं परिमाण दिलं आहे. मग तेलुगु साहि-

त्यिकांनी सातत्यानं वेमनाविषयी एवढी उपेक्षा, एवढा मूक तिरस्कार का प्रदर्शित केला असावा बरं ? हा प्रश्न मोकळेपणानं विचारला पाहिजे आणि त्याचं उत्तरही मोकळ्या मनानं दिलं पाहिजे.

पहिलं कारण असं दिसतं, की वेमनानं वेदांचा आणि वैदिक यज्ञसंस्थेचा उपहास केला आहे. तसंच पुराणं, त्यांचे नायक आणि सामाजिक न्यायाच्या बाबतीत, विषमता पाळणाऱ्या व भेदाभेद करणाऱ्या तत्त्वांचा वापर करणारी धर्मशास्त्रं, किंबहुना दैवी प्रेरणेनं जे जे निर्माण झालं आहे आणि ज्यांचा निर्णय अंतिम व बंधनकारक आहे, असं समजलं जातं, ते सर्व धर्मग्रंथ यांची त्यानं कुचेष्टा केली आहे. तो उघड उघड मूर्तिभंजक होता. सर्व प्रकारच्या मूर्तिपूजेला त्याचा कडवा विरोध होता आणि या प्रकाराला तर्कसंगत रूप देणाऱ्यांविषयी त्याच्या मनात मुळीच सहानुभूती नव्हती. तो सामाजिक बंडखोर आहे; आणि जातिभेदाविरुद्ध त्यानं अव्याहत झुंज दिली आहे. अस्पृश्यतेचा तर तो कट्टा विरोधक होता. अस्पृश्यता हा माणसानं माणसा-विरुद्ध केलेला महान गुन्हा आहे असं त्याचं म्हणणं होतं. त्याच्या या अशा विचारांमुळं परंपरानिष्ठ धार्मिकांच्या दृष्टीनं तो पाखंडी, नास्तिक व धर्मद्रोही मानला गेला. एवढंच नव्हे तर त्याचं नाव घेणंही त्यांच्या दृष्टीनं पाप होतं.

दुसरं कारण असं की वेमना जरी शिवभक्त होता, तरी गळ्यात शिवलिंग बांधणं, उपासतापास करणं, शिवरात्रीची जागरणं करणं, तीर्थयात्रा करणं या बाह्य विधींची तो रेवडी उडवीत असे. या धार्मिक दंभाचा त्यानं तीव्र निषेध केला आहे. लिंगधारकांना तो भोंदू म्हणत असे. त्यामुळे ज्येष्ठ शैव लेखकही त्याच्यावर संतापले आणि त्यांनीही त्याचा नामनिर्देश न करण्याच्या कारस्थानाला साथ दिली.

तिसरं कारण असं की वेमना हा जातीनं शूद्र आहे. तेलुगु काव्यशास्त्राचा एक श्रेष्ठ अधिकारी आचार्य अप्पकवी यानं तर असा दंडकच घालून दिला होता, की शूद्र कवी हातात आला, तर वाचल्या-देखल्याशिवायच त्याला टाकून द्यावा. उच्च-वर्णीयांचा शूद्र कवीबद्दलचा हा तिरस्कार इतका पराकोटीला गेला होता, की मद्रास प्रांताचा एक मुलकी अधिकारी चार्लस् फिलिप ब्राऊन यांनी कॉलेज बोर्डासाठी, १८२९ साली, ' वेमनाच्या कविता : नैतिक, धार्मिक व उपहासात्मक ' या नावानं त्याच्या काव्याचा एक संग्रह प्रकाशित केला. त्यावेळी या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या ५०० प्रतींपैकी ४५० प्रती अशा गूढ पद्धतीनं अदृश्य झाल्या (आणि फक्त पन्नास प्रती संपादकाच्या प्रती म्हणून त्याला नजर करण्यात आल्या), की कॉलेजबोर्डाच्या उच्चवर्णीय पंडितांच्या साह्यानं त्याचा छडा लावण्यासाठी त्या साहेबाला दहा वर्षं खटपट करावी लागली. रद्दी म्हणून या प्रतींचे गठ्ठे बांधून, त्यांना ग्रंथालयाच्या अडगळीच्या खोलीत फेकण्यात आलं होतं.

वेमनाविषयीचा हा तिरस्कार फार प्रखर होता. मद्रास स्टाफ कॉर्पस्‌चा एक अधिकारी मेजर आर. एम्. मॅक्डोनाल्ड यानं या घटनेबद्दल आपल्या लेखात, विस्तृत अभिप्राय व्यक्त केला आहे. त्याचा हा लेख 'मद्रास जर्नल ऑफ लिटरेचर अँड सायन्स' च्या अंकात १८६६ साली प्रसिद्ध झाला. त्याच्या लेखातला संबंधित उतारा इथं देण्यासारखा आहे. :

" डॉ. पोप यांनी असा अभिप्राय व्यक्त केला आहे की, वेमनाचं काव्य तेलुगु जनतेत अतिशय लोकप्रिय आहे परंतु त्याची ही लोकप्रियता शूद्रांपुरतीच मर्यादित आहे असं मी समजतो. इव्हँजेलिकलपंथाचा धर्मगुरू, कोलेन्सो पंथातील माणसाकडं ज्या दृष्टीनं पाहतो, त्याच दृष्टीनं हिंदुधर्मावर श्रद्धा ठेवणारा माणूस शूद्राकडं पाहत असावा. वेमनाच्या काव्याचं एक पुस्तक जेव्हा सरकारी शाळांतून अभ्यासक्रमात नेमण्यात आलं, तेव्हा या भावनेचं उघड प्रदर्शन झालेलं दिसलं. शिक्षक आणि विद्यार्थी दोघांनीही त्या आदेशाचं पालन करण्याचं टाळलं. कांही ठिकाणी, त्या पुस्तकाची वर्गातून ओळख करून देण्याचं काम या ना त्या कारणानं लांबणीवर टाकण्यात आलं, तर काही शाळांत शिक्षकांनी आपल्या जबाबदारीवर अभ्यासक्रमातल्या कांही कविता अश्लील व धर्मनिंदा करणाऱ्या आहेत या सबबीवर वगळून टाकल्या. विशेषत: ब्राह्मण, या कवीवर, अधिक रुष्ट आहेत आणि आपल्या मताच्या समर्थनार्थ ते या काव्याच्या शैलीतल्या रासवटपणावर आणि कवीच्या स्वैर जीवनावर बोट ठेवतात."

तीस वर्षांनंतरही या परिस्थितीत फरक पडला नाही. १८९८ साली, विल्यम हॉवर्ड कँबेल या धर्मोपदेशकानं मद्रास ख्रिश्चियन कॉलेज मॅगेझीनच्या अंकातील लेखात असं नमूद करून ठेवलं आहे — " ब्राह्मण हे नेहमीच त्याच्या (वेमनाच्या) शिकवणीचा अत्यंत कडवेपणानं विरोध करीत आले आहेत आणि त्याच्या काव्याबद्दल अजूनही तिरस्कारानं बोलतात. "

या बाबतीतलं चौथं कारण म्हणजे संकुचित अर्थानं वेमना हा विद्वान नव्हता. पूर्वी म्हटल्याप्रमाणे सामान्य लोकांच्या भाषेवर त्याचं असामान्य प्रभुत्व होतं यात संशय नाही. आपल्या कवितेत वापरलेल्या प्रत्येक शब्दाच्या सूक्ष्म अर्थच्छटा त्याला माहीत होत्या, एवढंच नव्हे तर , वापरातल्या जुन्या शब्दांना नवे अर्थ देण्याची शक्तीही त्याच्यात होती. भाषेतील विविध वाक्प्रचार व म्हणी यांचं विशाल भांडार त्याच्या जवळ होतंच, पण त्याबरोबरच नवीन वाक्प्रचार निर्माण करण्याची प्रतिभा-शक्तीही त्याच्या अंगीं होती. अनेक नवनव्या शब्दांचा तो शिल्पकार होता. त्याची शैली अल्पाक्षरयुक्त, चुरचुरीत व व्याजोक्तिपूर्ण उदाहरणांनी परिपूर्ण आहे; आणि जेव्हा स्फूर्तीनं प्रेरित होऊन, मारावून तो लिहितो, तेव्हा सुंदर अर्थांतरन्यास,

म्हणी, उत्स्फूर्त विचारमौक्तिकं, नीतिवचनं व बोधवचनं यांचा अगदी वर्षाव करतो. परंतु तेलगु वाङ्मयपंडितांना एवढं पुरेसं नव्हतं. अमरकोश आणि त्यासारखे इतर कोश जे मुखोद्गत करतात, व्याकरण आणि छंदशास्त्र यांच्या नियमांचं काटेकोरपणं पालन करून जे लिहितात, ज्यांची रचना पल्लेदार संस्कृत सामासिक शब्दांनी क्लिष्ट व जड बनलेली असते, अलंकारशास्त्र उशाला ठेऊन, त्याबरहुकूम जीर्ण-शीर्ण अलंकार वापरून, तसंच झिजलेल्या परंपरागत उपमा योजून आणि बुरसटलेल्या शिळ्या कल्पनांची पुनरावृत्ती करून; थोडक्यात, जुने परंपरागत विषय घेऊन ठराविक पद्धतीनं पांडित्यपूर्ण शुष्क काव्यरचना जे करतात, अशा लोकांनाच कवीच्या उच्च श्रेणीत स्थान मिळत होतं. आपल्या भूमीतील, लोकमानसातील शहाणपण व बुद्धिमत्ता घेऊन आलेल्यांना — मग त्यांचे विचार व अभिव्यक्ति कितीही मौलिक असो — त्यात स्थान नव्हतं. अर्धशिक्षित अडाणी म्हणून सतत त्यांची उपेक्षा करण्यात येत होती.

आणि शेवटचं कारण म्हणजे राजे-महाराजे, त्यांचे दरबारी आणि त्या दरबारातील कवी यांच्याबद्दल वेमनाच्या मनात अनादर होता. आपल्या आश्रयदात्याला प्रसन्न करून चार पैसे मिळवण्यासाठी कविता लिहिणं हा कवीच्या कार्याचा अपमान आहे, असं तो म्हणत असे. केवळ बंधमुक्त, स्वतंत्र व झुंजार आत्माच शाश्वत स्वरूपाचा संदेश देऊ शकतो, असा त्याचा विश्वास होता. जीवन-मरणातील अंतिम सत्यावर प्रकाश टाकण्यासाठी जे उपयोगी पडत नाही, मानवतेच्या सेवेसाठी जे झटत नाही, ते ज्ञान वं पांडित्य व्यर्थ आहे; ते शोभेचे निरुपयोगी अलंकार आहेत, या विचारावर त्याची श्रद्धा होती. त्या काळी सर्वच कवी आणि विद्वान कुठल्या तरी राजाचे आश्रित होते किंवा सत्ताधीशांच्या आणि श्रीमंतांच्या कृपेची याचना करणं हीच त्यांची महत्त्वाकांक्षा होती. हे लोक वेमनाचा द्वेष करीत होते आणि त्याच्या या वृत्तीबद्दल उद्दाम, उद्धट अशी विशेषणं त्याला लावीत होते; आणि वाङ्मयीन शस्त्रागारातल्या अनुल्लेखाच्या प्राणघातक शस्त्रानं त्याला मारण्याचा यत्न करीत होते. परंतु सामाजिक व धार्मिक क्षेत्रात स्वतःला सुधारणावादी म्हणवणाऱ्या वीरेश लिंगम यानंही या दुष्ट लोकांच्या गटात सामिल व्हावं, याचं काय कारण असावं ? अंशतः वेमनाच्या ग्रामीण अडाणी भक्तांनी आणि कुत्सितपणाने त्याची टवाळी करणाऱ्यांनी आणि चतुर आणि दुष्ट प्रवृत्तीच्या त्याच्या निंदकांनी या कवीच्या नावावर खपवलेल्या काही कवितांतली कामुकता आणि अश्लीलता पाहून या कट्टर (CROMWELLIAN) नीतिवाद्याला कदाचित त्याची घृणा आली असेल.

तेलुगू साहित्यसृष्टीतील प्रस्थापितांच्या दृष्टीनं बराच काळ बहिष्कृत ठरलेल्या या कवीचं काव्य जेव्हा पाश्चात्य लेखक आणि विचारवंत यांच्या पाहण्यात आलं,

तेव्हा ते त्याच्या कवितेनं प्रभावित झाले. अशा प्रकारें प्रभावित झालेल्या पाश्चात्य लेखकांपैकी फ्रेंच धर्मोपदेशक जे. ए. डुबॉय हे पहिले लेखक आहेत. आपल्या ' हिंदुरीतिरिवाज, रूढी आणि सण-समारंभ ' ( या ग्रंथाची पहिली इंग्रजी आवृत्ती सन १८७१ साली प्रकाशित झाली) या ग्रंथात, भारतीय तत्त्वज्ञ कवींची त्यांनी चर्चा केली आहे. त्या चर्चेच्या ओघात ते म्हणतात :

" ह्यांपैकी वेमना हा सर्वांत अधिक प्रसिद्ध आहे. रेड्डी जातीत, कडप्पा जिल्ह्यात जन्मलेला हा तत्त्वज्ञ कवी सतराव्या शतकाच्या शेवटी मरण पावला असं आम्हाला सांगण्यात आलं. त्याच्या काव्यातले काही उतारे माझ्या पाहण्यात आले. ते मला फार आकर्षक, चिंतनीय वाटले. सूक्ष्म दृष्टी आणि स्वतंत्र विचार ही या कवितांची मुख्य वैशिष्ट्यं आहेत. "

मद्रास सरकारच्या मुलकी सेवेतले चार्लस् फिलिप ब्राऊन (ज्यांचा आम्ही यापूर्वी उल्लेख केला आहे) यांचा वेमनाच्या काव्याशी अधिक निकटचा परिचय होता. हे गृहस्थ विद्वान तर होतेच पण त्यापेक्षाही ते एक भाषाशास्त्रज्ञ होते आणि वेमनाच्या काव्याकडं पाहाण्याचा त्यांचा दृष्टिकोन मुख्यतः भाषाशास्त्रीयच होता. त्यांनी स्वतःच असं नमूद करून ठेवलं आहे : " भाषेच्या अभ्यासकाच्या दृष्टीनं उपयुक्त अशा सुबोध शैलीत आणि विविध विषयांवर लेखन केलेल्या कवींच्या शोधात असताना वेमनाच्या काव्याशी माझा परिचय झाला. " आपल्या या मर्यादित दृष्टीचा उल्लेख करून, पुढं त्यांनी एक अप्रसिद्ध ग्रीक कवी लूशियन याचा उल्लेख केला आहे. पुढं ब्राऊन म्हणतात — " तेलुगु भाषेतील हा कवी (वेमना) आणि ग्रीक कवी लूशियन या दोन कवींचं आपापल्या भाषेत सारखंच स्थान आहे. या कवीची रचना काव्यमय किंवा अभिजात नसली तरी नवशिक्याला ती उपयोगी आहे." यावरून हे स्पष्ट होतं, की ब्राऊनला वेमनाचं महत्त्व तेलुगुच्या प्राथमिक वर्गातल्या क्रमिक पुस्तका-तल्या धड्यापेक्षा अधिक वाटलं नाही.

परंतु ब्राऊनच्या या मताची फार कठोरपणे आलोचना करण्याची आवश्यकता नाही. कारण तोच असा पहिला माणूस आहे ज्यानं वेमनाच्या कविता एकत्र केल्या, त्यांचं विषयवार वर्गीकरण करून संकलन व संपादन केलं आणि स्वतःच तो संग्रह छापून प्रसिद्ध केला. शिवाय त्याच्या काव्याचे इंग्रजी व लॅटिन् भाषेत भाषांतर करणारा तोच पहिला भाषांतरकार होता. काळजीपूर्वक, परिश्रम घेऊन उत्साहानं त्यानं या कार्यास चालना दिली. म्हणूनच तेलुगु भाषेतील प्रतिष्ठित साहित्यिकांना वेमनाकडं दुर्लक्ष करणं पुढं अशक्य झालं. ' वेमनाची कविता : नैतिक, धार्मिक, उपहासात्मक ' या पुस्तकाला त्यानं जी प्रस्तावना लिहिली आहे तीत, संशोधन करताना ज्या अडचणी आल्या त्यांचं त्यांनी वर्णन केलं आहे. :

" एखाद्या भाषेच्या अभ्यासाला सुरुवात करताना, त्या विशिष्ट देशी भाषेत कोणता ग्रंथ लोकप्रिय आहे याचा आम्ही प्रथम शोध घेतो. तसंच त्या ग्रंथाची रचना सुबोध शैलीत आहे आणि परदेशी माणसाला तो ग्रंथ विनासायास समजू शकतो की नाही, हे आम्ही पाहतो. तेलुगु भाषेच्या संदर्भात, अशा पुस्तकाचा शोध घेत असताना, या ग्रंथात संकलित करण्यात आलेल्या कवितांशी माझा परिचय झाला. वेमा अथवा वेमना (या दोन्ही नावांनी हा कवी ओळखला जातो) याची बरीच हस्तलिखितं माझ्या हातात पडली. माझ्या सार्वजनिक सेवेच्या कामांतून जो वेळ मला मिळत होता, त्या फावल्या वेळात मी या कवितांचं संशोधन चालू ठेवलं आणि त्यांचा अनुवादही केला. या हस्तलिखितांतल्या कवितांमध्ये शुद्धलेखनाच्या, छंदाच्या, अर्थाच्या आणि इतर अनेक प्रकारच्या चुका मला आढळल्या. कोणत्याही दोन हस्तलिखितांतली रचना, क्रम एकमेकांशी जुळत नव्हता; आणि ह्या लहान–लहान कवितांची संख्या दोनशे पासून आठशेपर्यंत अशी वेगवेगळी असल्याचं मला दिसून आलं. मच्छलीपट्टण येथील मुक्कामात मला ज्या हस्तलिखितांच्या प्रती मिळाल्या त्या मी आधी एकत्रित केल्या. नंतर विझगापट्टण, नेल्लोर, गुंटूर, कडप्पा येथील उपलब्ध प्रती हळूहळू जमा केल्या. मग एक नऊ कॉलमी तक्ता तयार केला. त्यात कोणती कविता कोण-कोणत्या हस्तलिखितांत समाविष्ट करण्यात आली आहे याची नोंद केली. त्याच्या आधारावर पुढे मला कवितांची वर्गवारी करणं शक्य झालं. या हस्तलिखितांतून उपलब्ध झालेल्या पद्यांची एकूण संख्या २५०० झाली. परंतु नंतर तपासणी करताना ही संख्या २००० पेक्षा किंचित जास्त आहे असं आढळून आलं.

त्यानंतर या कवितांची विषयानुरोधाने वर्गवार विभागणी करणं आवश्यक झालं. या कवितांच्या नकला करणाऱ्या प्रत्येक लेखकानं आपापल्या लहरीप्रमाणे कवितांचा क्रम लावला होता. त्यात कसलीच सुसूत्रता नव्हती. मग मी या साऱ्या कवितांची स्थूल मानाने वर्गवारी करून धार्मिक, नैतिक, उपहासात्मक, गुढवादी आणि संकीर्ण अशा पाच भागांत त्यांचं संकलन केलं.

यानंतरचे वेमनाचे दोन पाश्चात्य गुणग्राहक व रसिक म्हणजे डॉ. जी. यू. पोप आणि मेजर आर. एम्. मॅकडोनाल्ड हे होत. डॉ. डुबॉय यांनी लिहिलेल्या ' हिंदु रीतिरिवाज, रूढी आणि सण-समारंभ ' या ग्रंथाच्या, स्वतः संपादित केलेल्या आवृत्तीत, त्यांनी असा अभिप्राय व्यक्त केला आहे — " वेमनाच्या कवितांतली लय आणि गोडी यांना तुलना नाही." तर मेजर मॅकडोनाल्ड यांनी असं मत व्यक्त केलं आहे — " आपल्या काव्यानं पाश्चात्यांचं लक्ष वेधून घेणारा वेमनासारखा कवी समग्र तेलुगू साहित्यात दुसरा नाही. "

वेमनाच्या दुसऱ्या इंग्रजी अनुवादकाचं नांवदेखील चार्लस्च आहे – चार्लस् इ. गोव्हर. त्याला अनुवादक असं संबोधणं कदाचित तितकंसं बरोबर ठरणार नाही. चार्लस् फिलिप ब्राऊन यांनी केलेल्या इंग्रजी गद्य अनुवादाच्या आधारानं हा पद्य अनुवाद तयार केला आहे, असं स्वतः गोव्हर यांनीच कबूल केलं आहे. वेमना हा ' पूर्णपणे बुद्धिनिष्ठ व एकेश्वरवादी ' असल्याबद्दल त्याची प्रशंसा करून पुढे गोव्हरनं असं म्हटलं आहे — " चांगल्या अर्थानं त्याची कविता उत्कटपणे ग्राम्य आहे. नैतिक भावनेच्या दृष्टीनं त्याच्या कवितेचा क्रम तिरुवल्लुवर या कवीच्या तुलनेत त्यानं 'फार खाली' लावला आहे आणि कवित्वशक्तीच्या कसोटीवर त्यानं त्याला अजून, खालच्या क्रमावर आणला आहे. त्याचं हे मूल्यमापन बरोबर आहे की नाही हे सांगता येणार नाही; परंतु या संबंधीची एक गोष्ट मला उल्लेखनीय वाटते. व्हिन्सेंट ए. स्मिथ याला आपल्या ' आक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ' या ग्रंथात, ' भारतातल्या जातिभेदावर निर्भय व तीव्र हल्ला चढवणारा भारतीय लेखक ' हवा होता. तेव्हा तो वेमनाच्या काव्याकडे वळला आणि १८७१ साली प्रसिद्ध झालेल्या गोव्हर यांच्या ' दी फोक सॉंगस् ऑफ सदर्न इंडिया ' या पुस्तकातून त्यानं त्याच्या चार कविता उद्धृत केल्या.

ब्राऊन किंवा गोव्हर यांच्यापेक्षा कॅम्बेल हा वेमनाला न्याय देणारा खरा समीक्षक म्हटला पाहिजे. मद्रास ख्रिश्चियन कॉलेज मॅगेझीन ' मध्ये प्रसिद्ध केलेल्या लेखात, वेमनाच्या संदर्भात त्यांनी असे उद्गार काढले आहेत :

" वेमना हा मुख्यतः जनतेचा कवी आहे. पंडितांसाठी त्यानं लेखन केलं नाही, तर साध्यासुध्या अशिक्षित ग्रामीण जनतेसाठी त्यानं आपल्या कविता लिहिल्या आहेत; आणि त्याच्या सोप्या, सहज पण उत्कट शैलीत व प्रभावशाली उपदेशात, त्याच्या लोकप्रियतेचा उगम आहे. केवळ वाङमयीन कीर्तीचा त्याला हव्यास नव्हता. म्हणून त्यानं अभिजात काव्याचे नियम व संकेत धुडकावून लावले. त्याच्या या कृतीत त्याचं शहाणपण दिसून आलं. भारतात अभिजात कविता ही कधीच लोकप्रिय होऊ शकत नाही, कारण या देशातील बहुसंख्य लोकांना ती पूर्णपणे अनाकलनीयच वाटते. वेमनाच्या लोकप्रियतेचं रहस्य प्रामुख्यानं त्याच्या कवितेतल्या तीव्र व सामर्थ्यशाली उपहासात आहे. मनुष्यातला दुबळेपणा आणि मूर्खपणा सूक्ष्म दृष्टीनं त्यानं न्याहळला होता आणि त्याच्यातल्या या विसंगतीची व क्षुद्रतेची हास्यास्पद चित्रं त्यानं रेखाटली आहेत.... वेमना हा नुसता उपहास-विडंबनकार नव्हता, तर तळमळीचा सुधारक होता. आपल्या देशबांधवांबद्दलचं एक मोठं कार्य, एक मोठी जबाबदारी आपल्यावर सोपवण्यात आली आहे अशी त्याची श्रद्धा होती; आणि या ध्येयसिद्धीच्या आड येणाऱ्यांना त्यानं कडक विरोध केला होता. वेमनाची विश्वाची कल्पना इतर भारतीय

तत्त्वज्ञाप्रमाणे अद्वैतवादी नाही. ती मुख्यतः द्वैतवादी आहे. परमात्मा आणि जीवात्मा यांच्यातला भेद त्याला मान्य होता. परंतु मानवी इच्छाशक्तीलाही महत्त्वाचं स्थान आहे असं तो मानतो. त्यामुळं मनुष्य हा दैवी शक्तीच्या हातातलं केवळ खेळणं आहे हे मत त्याला मान्य नव्हतं. संन्यासाचा त्यानं जोरदारपणे कडक शब्दात निषेध केला आहे. त्याचा हा विचार वायक्लिफ किंवा लूथर यांनादेखील गौरवास्पद वाटला असता.

वेमनाची वाढती साहित्यिक कीर्ती, प्रतिष्ठा आणि भारत देशातलं झपाट्यानं बदलणारं सामाजिक, धार्मिक व नैतिक वातावरण, ह्यामुळं तेलुगु साहित्यातील मठाधीशांना वेमनाबद्दलचा मूळचा तीव्र, मूक तिरस्कार कायम ठेवणं अधिकाधिक कठीण होत गेलं असावं. विशेषतः ' कवित्व-तत्त्व-विचार ' या नव्याने प्रकाशित झालेल्या वाङ्मय–समीक्षाग्रंथानं वेमनाविरुद्धच्या सर्व आक्षेपांना सर्वात मोठा सुरुंग लावला, आणि विरोधकांचा किल्लाच ढासळला. १९१४ साली डॉ. सी. आर. रेड्डी यांनी प्रथमतः हा ग्रंथ प्रकाशित केला. वडिलांच्या शिकवणीखाली किशोरवयातच डॉ. रेड्डींना तेलुगु अभिजात वाङ्मयाचा चांगला परिचय झाला होता. पुढं मद्रास आणि त्यानंतर केंब्रिज येथील विद्यापीठात घेतलेल्या उच्च शिक्षणामुळं पाश्चात्य वाङ्मयातील श्रेष्ठ कृतींचीही त्यांना ओळख झाली. निसर्गाकडून त्यांना प्रखर बुद्धिमत्ता, चमकदार विनोदबुद्धी, देणगी म्हणून लाभल्या होत्या. मनानं आणि शिक्षणानं ते पूर्णपणे आधुनिक होते. साहित्यसमीक्षेच्या या ग्रंथात त्यांनी आपल्या श्रेष्ठ बौद्धिक सामर्थ्याचं दर्शन घडविलं आहे. बॉम्बच्या स्फोटासारखा हा ग्रंथ बाहेर आला आणि त्यानं साहित्यविषयक चुकीच्या कल्पनांचा आणि दूषित पूर्वग्रहांचा धुव्वा उडविला. आजही तेलुगु साहित्य टीकाविषयक वाङ्मयात या ग्रंथाला श्रेष्ठ व मानाचं स्थान प्राप्त झालं आहे. एक नवा मनू निर्मिणाऱ्या या ग्रंथात, डॉ. रेड्डी यांनी वेमनाचा 'आंध्र प्रदेशात जन्मलेला एक श्रेष्ठ प्रतिभावान कवी ' असा गौरव केला आहे. सर्जनशील कल्पना, सुभाषितं आणि विनोद, निर्भय मौलिक अभिव्यक्ति इत्यादी काव्यगुणांनी शोभणारा आणि समाजातील भ्रामक कल्पना व दंभाचार यांचा बुरखा फाडणारा, तेलुगु वाङ्मयातला हा एक श्रेष्ठ कवी आहे. असा अभिप्राय त्यांनी या कविसंबंधी नोंदविला आहे.

अशा प्रकारे वेमनाविरोधी आघाडी खिळखिळी झाल्यानंतर, साहित्य–क्षेत्रातल्या मठपतींना हे कबूल करावं लागलं, की वेमनाचा गरजणारा हा धीरगंभीर आवाज चिरडता येणार नाही आणि त्याचं चपल व चैतन्यशाली व्यक्तित्व नष्ट करता येणार नाही. त्यांची दृष्टी धर्मवेडानं, सामाजिक अहंकारानं आणि खोट्या

वाङ्मयीन मूल्यांनी अंध झाली नसती, तर वेमना हा अमर आहे हे त्यांना यापूर्वीच कळून आलं असतं. शब्दशक्ती आणि समर्थ व्यक्तित्व यांच्या जोडीला या दोन्ही-पेक्षाही मोठा, त्याला मृत्युंजयी करणारा असा एक शक्तीस्त्रोत त्याच्या पाठीमागे उभा होता. आपल्या जीवनकालातच तो एक महदाख्यायिका — ' मिथ ' बनला.

# आख्यायिकांच्या अंकावर

' पुरातन आख्यायिकांच्या अंकावर तो निद्रिस्त झाला ' — कीटस्.

जिवंतपणीच एक अविश्वसनीय आख्यायिका बनलेला वेमना, पुढं आख्यायिकांची रास, दंतकथांचा डोंगर झाला. अनेक दृष्टींनी तो असामान्य होता. वागण्या-सवरण्यात, पोशाख-वस्त्रांत आणि वस्त्रहीनतेतही; तसंच स्वभावात, शिकवणुकीत आणि इतरही अनेक बाबतीत तो असामान्य व्यक्तित्वाचा माणूस होता. त्याची ही असामान्यता अशा स्वरूपाची होती, की कोणी त्याला महात्मा म्हणून वंदन करीत असत, तर दुसरे कुणी विदूषक आणि भ्रमिष्ट म्हणून त्याला टाळीत असत. कुठल्याही देशात आणि कोणत्याही काळात, अशा माणसाभोवती आख्यायिकांचं रान पिकतं. श्रद्धाळ माणसांच्या समाजात दळणवळणाच्या साधनांच्या बाबतीत तोकड्या असलेल्या प्रदेशात वेमनानं आपलं आयुष्य घालवलं. त्यामुळं तो अद्भूत, हास्यास्पद, हलक्या, घाणेरड्या, अशा अनेक प्रकारच्या आख्यायिकांचं व दंतकथांचं केन्द्र बनला.

वेमनाला गुरू आणि देव मानून पूजा करणाऱ्या त्याच्या भक्तांना, या आख्यायिकांतला वेमनाच खरा वेमना वाटतो आणि त्यांच्या दृष्टीनं तो हिमालयाइतका वास्तव व पवित्र आहे. या आख्यायिकांच्या व दंतकथांच्या मागं दडलेल्या ऐतिहासिक वेमनाचा शोध घेणं म्हणजे, त्यांना उद्धटपणा, पावित्र्य-विडंबन वाटतं. त्याच्या भक्तगणांखेरीज जे हजारो लोक आहेत, त्यांचंही बहुतेक असंच मत आहे, असं दिसतं. कारण वेमनावर लिहिलेलं चिकित्सक असं एकच चरित्र तेलुगु भाषेत उपलब्ध आहे, तर दंतकथेवर आधारित – ' दांतापासून दांताकडे जाऊन संपणारी ' — अशी त्याची एक डझनाहून अधिक चरित्रं त्या भाषेत प्रचारांत आहेत. सी. रामकृष्णराव यांनी इंग्रजी भाषेत प्रसिद्ध केलेलं त्यांचं एकुलतं एक चरित्रदेखील आख्यायिकांची एक मालाच आहे. मछलीपट्टणचे आर. पूर्णय्याचारलु हे वेमनाच्या चरित्रकारांपैकी सर्वांत पहिले चरित्रकार. त्यांचं शिक्षण बेताबाताचं होतं आणि त्यांची सांपत्तिक स्थिती तर त्यापेक्षा वाईट होती. परंतु वेमनाविषयीच्या आदर-भावनेच्या दृष्टीनं ते खूप श्रीमंत होते. हे गृहस्थ जिल्हा पोलीस कचेरीत साधे कारकून होते. ब्राऊननं सुरू केलेलं कार्य चालू ठेवायचं या आकांक्षेनं प्रेरित होऊन, ताडपत्रांवर लिहिलेल्या

हस्तलिखितांच्या शोधात सारा प्रदेश त्यांनी पायाखाली घातला. लोकांच्या तोंडी असलेल्या शेकडो कविता त्यांनी उतरून घेतल्या. आपल्या दृष्टीनं, कवीच्या जीवनातील वास्तव वाटलेल्या सर्व घटना, त्यांनी टिपून घेतल्या; आणि अनेक वर्षांच्या अविश्रांत परिश्रमाने १९१३ साली वेमनाच्या कवितांचा एक संग्रह त्यांनी प्रकाशित केला. त्या काळातला, तो वेमनाच्या काव्याचा सर्वांत मोठा संग्रह मानला गेला होता. या संग्रहात एकूण ४३०५ कविता संग्रहीत करण्यात आल्या होत्या. त्यानंतर त्यांनी कवीचं चरित्रही लिहून प्रसिद्ध केलं. त्यात कवीची अनेक काल्पनिक चित्रं रंगविण्यात आली होती. या लेखकानं वेमनाचं वर्णन व्यासाच्या शब्दात ' पुरुषर्षभ ' (माणसातला वृषभराज, नरपुंगव), असं केलं आहे आणि त्याबद्दल लेखकाला फार अभिमान वाटत होता.

पूर्णय्याचार्लूचं ' वेमनायोगिंद्र चरितमु ' (योगिंद्र वेमना यांचं चरित्र) हे पुस्तक, ह्या प्रकारातल्या इतर चरित्राप्रमाणं वाचायला मोठं आकर्षक आहे. पण त्यासाठी आपण आधी आपल्या बुद्धीला रजा दिली पाहिजे. तर्काला निद्रिस्त अवस्थेत टाकलं पाहिजे आणि मग दंतकथांच्या संधिप्रकाशात त्या जगात प्रवेश केला पाहिजे. केवळ करमणूक म्हणून या विश्वात आता आपण प्रवेश करू आणि त्याचे शिष्य व भक्तगण वेमनाला ज्या स्वरूपात पाहातात त्या रूपात आपणही त्याला पाहण्याचा प्रयत्न करू. सुरवातीलाच एक सूचना देऊन ठेवतो की आता आपण ज्या अविश्वसनीय, मायावी जगात प्रवेश करणार आहो, त्यातल्या चपळ वृत्तीच्या नायकाची भेट होण्यापूर्वी आपल्याला फार लांबच्या काळात व दूरच्या प्रदेशात बराच प्रवास करावा लागणार आहे.

फार पूर्वीच्या काळी एक माणूस तीर्थयात्रेसाठी निघाला. वेमा हे त्याचं नाव. तो जातीनं वैश्य होता. तेलुगु भाषेत त्यालाच ' कोमटी ' म्हणतात. हा यात्रेकरू श्रीशैलाच्या यात्रेला चालला होता. श्रीशैल हा पर्वत कर्नूल जिल्ह्यात असून, निबिड अरण्यानं तो आजही झाकलेला आहे. हा डोंगराच्या उतरणीचा प्रदेश, आडवीतिडवी वळणं घेत वाहत जाणाऱ्या कृष्णानदीच्या काठाकाठानं पसरला आहे. अशा या पर्वताच्या शिखरावर शिवाचं हे प्राचीन मंदीर वसलं आहे. एका पवित्र ज्योतिर्लिंगाचं हे जागृत स्थान असून मल्लिकार्जुनाच्या दयाळू रूपानं व नावानं ते प्रख्यात आहे. शिवपूजेसाठी निश्चित केलेल्या शिवरात्रीच्या दिवशी, या श्रीशैल पर्वतावर हजारोंच्या संख्येत यात्रा भरते. इथे येणारे शिवभक्त यात्रेकरू उपास करतात आणि रात्रभर शिवाची आराधना करीत असतात. कृष्णेच्या निळ्या प्रवाहात हे भक्त स्नान करतात, कपळावर आणि अंगावर भस्माचे पट्टे ओढतात. शंखाच्या नादांत

आणि टाळमृदुंगांच्या गजरांत गातात, नाचतात, रात्रभर पूजा-अर्चा व मंत्रजागर करतात. अशा यात्रेकरूंच्या मेळाव्यात, तेराव्या शतकाच्या शेवटी आलेला एक यात्रेकरू म्हणजे हा वेमा कोमटी.

शिवरात्रीच्या दुसऱ्या दिवशी सर्व यात्रेकरू आपापल्या घरी परतले. परंतु हा वेमा कोमटी तिथंच राहिला. यात्रास्थानातल्या वातावरणात, त्याच्या सावध, चोरट्या हालचाली तिथल्या पुजाऱ्यांना संशयास्पद वाटल्या आणि त्यांनी तात्काळ त्याला जाण्याची आज्ञा केली. तेव्हा कोमटी वेमा त्यांना विनवून म्हणाला, " महाराज, मला का हाकलता ? मी ईश्वराची पूजा-प्रार्थना करून त्याची कृपा संपादन करू इच्छितो. त्याच्या या नम्र उत्तरापुढं पुजाऱ्यांनी माघार घेतली आणि त्याला राहाण्याची परवानगी दिली. परंतु शिवालयाच्या उत्तरेकडच्या निबिड अरण्यात न जाण्याविषयी त्याला ताकीद दिली. ' ते अरण्य सर्पांनी व्यापलेलं असून, तिथं रानटी श्वापदंही फिरतात ' अशी धोक्याची सूचनाही त्यांनी त्याला दिली. परंतु त्या धोक्याच्या सुचनेतच कोमटी वेमाला तिथल्या रहस्याचा सुगावा लागला आणि संधी मिळताच तो त्या निषिद्ध अरण्यात शिरला. परत येताना रस्ता चुकू नये म्हणून त्याने मोहरीची पुडी घेतली आणि त्या नागमोडी वाटांत मोहऱ्या टाकीत त्या घनदाट जंगलात तो शिरला. धोके पत्करून परिश्रमपूर्वक माग काढीत तो गेला आणि त्याला शेवटी हवं असलेलं पाण्याचं कुंड मिळालं. हेच ते, ' पारसतीर्थ '. याच कुंडाच्या शोधार्थ तो या अरण्यात शिरला होता. इतकंच नाही, तर श्रीशैलाच्या यात्रेच्या मुळाशी त्याचा हाच एकमेव हेतू होता. खात्री करून घेण्यासाठी लोखंडाची कांब त्यानं त्या किमयेच्या पाण्यात बुडविली आणि काय आश्चर्य ! ती पूर्ण कांब भरीव सोन्याची झाली. हर्षभरानं दोन मडकी त्यानं कुंडातल्या पाण्यानं भरून घेतली आणि शिंपडलेल्या मोहरीच्या खुणेच्या वाटेनं तो ताबडतोब परत फिरला.

मंदिर आणि तिथले पुजारी यांना चुकविण्याच्या हेतूनं कोमटी वेमानं मुद्दाम दूरचा, आडवळणाचा रस्ता धरला आणि वेगाने वाटचाल करीत तो ' अनुमकोंडा ' या गावापाशी येऊन पोचला. सूर्यास्तानंतर एक तासानं चोहीकडं दाट काळोख पसरला, तेव्हा त्यानं दोन्ती अलिया रेड्डी या शेतकऱ्याकडं जाऊन रात्रभर आसरा देण्याची त्याला विनंती केली. (काही प्रतींत, दोन्ती अल्लादा रेड्डी असा या शेतकऱ्याचा उल्लेख आढळतो.) गोठ्याची जागा त्याला दाखवण्यात आली. तिथं जाऊन त्यानं ती मडकी नांगराच्या मागं लपवून ठेवली आणि रात्रीच्या जेवणाकरिता तो आपल्या जातीच्या माणसाचा शोध घेण्यासाठी बाहेर पडला. कोमटी वेमा बाहेर गेल्यावर, त्याच्या माघारी अलिया रेड्डी, गुरांना रात्रीचं चारापाणी करण्यासाठी

गोठ्यात गेला. तिथं सोन्यासारखं काही तरी चमकत असलेलं पाहून तो आश्चर्यचकित झाला. जवळ जाऊन पाहातो तर, एका नांगराचा फाळ सोन्याचा झालेला त्याला आढळला. चुकून झालेल्या पारस-जलाच्या स्पर्शानं तो लोखंडी नांगर सोन्याचा झाला होता. थोडा वेळ विचार करून, अलिया रेड्डीने, पारस-जलाची ती मडकी आपल्या घरात नेऊन लपवली आणि गुरांची दावी सोडून, त्या गवताच्या गोठ्याला आग लावून दिली. गोठा धडाडून पेटला आणि त्या आगीनं आकाश लाल झालं. ते पाहताच कोमटी वेमा धावत-पळत परत आला. आपली मडकी वाचवण्यासाठी त्यानं आगीत उडी घेतली; आणि त्या भडकत्या ज्वाळांत जळून त्याची राख झाली.

अलिया रेड्डी हुशार व दूरदृष्टीचा माणूस होता. म्हणून एकदम श्रीमंत होण्याचा हव्यास त्यानं धरला नाही. पारस-जलाचा उपयोग त्यानं काळजीपूर्वक, काळाचं योग्य अंतर राखून केला आणि हळूहळू बराच जमीनजुमला, घरं खरेदी केली. तसंच कित्येक खंडी गुरंही विकत घेतली. परंतु श्रीमंतीबरोबर त्याची दुःखंही वाढत गेली. कोमटी वेमा आता भूत झाला होता, सूडानं पेटलेला समंध ! त्यानं अलिया रेड्डीवर एकाहून एक भयंकर संकटं आणली. त्याचे मुलगे एकानंतर एक अचानक आजारी झाले आणि मरण पावले. तो भयंकर अस्वस्थ झाला. प्रोलय्या हा एकच मुलगा शेवटी उरला. तो जर गेला, तर त्याच्या संपत्तीला वारस व्हायला आणि पितरांना तिलांजली द्यायला कोणी मागं उरला नसता. त्याला आपलं हे भय, दुःख कोणाजवळ बोलता येत नव्हतं किंवा त्याचं मूळ कारणही कोणाला उघड करून सांगता येत नव्हतं.

दुर्दैवाचा शेवटचा आघात आपल्या शिरावर लवकरच होणार या भीतीनं घाबरलेल्या अवस्थेतच तो झोपी गेला असता, एके दिवशी त्या अस्वस्थ निद्रेत त्याला एक स्वप्न पडलं. त्या स्वप्नात कोमटी वेमा भयंकर रूप धारण करून त्याच्यासमोर उभा राहिला. अलियानं त्याच्या पायावर लोटांगण घातलं आणि क्षमेसाठी त्याला विनवलं, " सांग, सांग . . . . . . ." काकुळतीनं तो म्हणाला, " तुला शांत करण्यासाठी मी काय करू ते सांग महाराजा. " कोमटी वेमालाही त्याची दया आली. क्षमेसाठी दोन अटी त्यानं पुढे मांडल्या. एक त्यानं कोमटी वेमाचा सोन्याचा पुतळा उभारावा आणि त्याला कुलदेवता मानून नित्यनेमानं त्याची पूजा करावी. दुसरी अट अशी की त्याच्या कुलातल्या सध्याच्या आणि पुढील पुरुषसंततीची नावं त्याच्या नावावरून ठेवण्यात यावी. ह्या दोन अटींचं कडक रितीनं पालन केलं तर अलिया रेड्डीच्या कुलाचा विस्तार होईल. त्याचं वैभवही वाढेल. लवकरच त्याला राज्यप्राप्ती होईल आणि शंभर वर्षेपर्यंत अखंडीतपणे त्याचं घराणं सत्तेवर राहील. अलिया

रेड्डीनं तात्काळ संमती दिली: त्यानं त्याच्या दोन्ही अटी मान्य केल्या. लगेच, दुसऱ्याच दिवशी त्यानं वेमाची सुवर्णमूर्ती तयार करण्यासाठी सोनारांना बोलावून कामाला लावलं. नंतर पहिल्याच शुभमुहूर्तावर त्यानं थाटामाटानं समारंभपूर्वक त्या मूर्तीची देवालयात स्थापना केली. तसंच त्यानं, राहिलेल्या एकुलत्या एक मुलाचं नाव बदलून प्रोलय्या रेड्डी ऐवजी प्रोलय्या वेमा रेड्डी असं ठेवलं.

त्या दिवसापासून, कोमटी वेमाच्या समंधाने अलिया रेड्डीला त्रास द्यायचं बंद केलं. त्यानंतर त्याला दोन मुलं झाली. त्यानं त्यांची नांवं अनुक्रमे अनावोता वेमा रेड्डी आणि अना वेमा रेड्डी अशी ठेवली. त्यानंतर तो सुखानं राहू लागला. परंतु पुढे जुनं वातावरण आणि तिथल्या जुन्या दु:खद आठवणी यांचा विसर पडावा म्हणून नवीन गावी, नवीन वातावरणात जाऊन राहाण्याचा त्यानं विचार केला; आणि सन १३२३ साली, आपल्या कुटुंबियांसह आणि पारस-जलाचे अमूल्य कुंभ घेऊन तो गुंटूर जिल्ह्यातील कोंडावीडू या लहानशा गावी येऊन राहिला.

इथं येऊन राहिल्यावर एक-दोन वर्षांतच अलिया रेड्डी वारला. परंतु मृत्यू-पूर्वी आपला मुलगा प्रोलय्या वेमा रेड्डी याला राज्यपद प्राप्त झाल्याचा आनंद-सोहळा त्यानं पाहिला. प्रोलय्यानं, पारसजलाचा भरपूर उपयोग करून सुवर्णाची मोठी रास जमवली आणि त्याच्या साह्यानं प्रथम त्यानं कोंडावीडू गावाभोवती तट बांधला. सैन्य जमा केलं आणि शेजारचा मुलुख जिंकून घेतला. काकतीय साम्रा-ज्याच्या अस्तानंतर जी पोकळी निर्माण झाली होती, तिचा त्यानं पूर्ण लाभ घेतला. सन १३२८ साली स्वतंत्र, सार्वभौम राजा म्हणून त्यानं आपल्या नावाची द्वाही फिरविली.

बारा वर्षांनंतर प्रोलय्या वेमा मरण पावला. त्याच्यामागं त्याचा भाऊ अनावोता वेमा रेड्डी सिंहासनावर बसला. अनावोता शूर, धाडसी होता. त्यानं अनेक युद्धं केली आणि दुप्पटीनं आपल्या राज्याचा विस्तार घडवून आणला. परंतु सतत चाल-लेल्या त्याच्या या लढायांमुळं राज्याच्या कोशात धन उरलं नाही. अशा संकटात आपल्या भावाप्रमाणे पारसजलाचा उपयोग करण्याची शक्यताही राहिली नाही. कारण ते अद्‌भुत किमयाजल आता संपलं होतं. पण अचानकपणे भाग्योदयाची एक संधी त्याला प्राप्त झाली.

जादू आणि गुढ विद्येत प्रवीण असलेल्या एका योग्यानं, एकांतस्थळी यज्ञ सुरू केला. हा यज्ञ पूर्ण होण्याकरिता त्याला मानवी आहुतीची गरज होती. तेव्हा त्यानं एका गरीब धनगराला संपत्तीचं आमिष दाखवून यज्ञवेदीवर बळी देण्यामाठी आणलं आणि त्याला धडधडत्या अग्निज्वाळांत ढकलण्याचा प्रयत्न केला. परंतु या झोंबाझोंबीत धनगर निसटला आणि योगी स्वत:च जळत्या यज्ञकुंडात पडला.

घाबरलेला धनगर पायातले बळ एकवटून धावला व पळत पळत आपल्या झोपडीत आला. परंतु त्या योग्याचं काय झालं असेल याबद्दलचं त्याचं कुतूहल त्याला स्वस्थ बसू देईना. त्या कुतूहलानं दुसऱ्या दिवशी सकाळी, त्याला जिथून तो मरता मरता वाचला होता, त्या स्थळी ओढून आणलं. तो त्या ठिकाणी आला तेव्हा, समोरच्या दृष्यावर त्याचा विश्वासच बसेना. पुरुषभर उंचीच्या दोन सुवर्णमूर्ती त्या यज्ञवेदीत उभ्या होत्या. अस्वस्थपणे तो रात्रीची वाट पाहत बसून राहिला. अंधार होताच आपल्या बायकोला व मुलांना घेऊन तो तिथे आला आणि त्यांच्या साह्याने त्या सुवर्णमूर्ती तिथून त्यानं आपल्या झोपडीत हलवल्या. त्या मूर्तींच्या सोन्याच्या चिपा काढून त्यानं व्यापार सुरू केला. त्यानं आपल्या मेंढयांचे कळप वाढवले आणि इतर अनेक मार्गांनी आपल्या संपत्तीत वाढ केली. काही दिवसांनी, धनगराच्या या अचानक व विलक्षण श्रीमंतीची बातमी महाराज अनावोताच्या कानी गेली, त्यानं धनगराच्या झोपडीचा झाडा घेण्यासाठी आपले सैनिक पाठवले. तिथं त्यांना दोन सुवर्णमूर्तींचा शोध लागला आणि त्यांनी त्या जप्त केल्या. अशा रितीनं त्या राजाची आर्थिक चिंता नष्ट झाली.

तीस वर्षे वभवात राज्य केल्यानंतर, १३७० साली अनावोता वेमा वारला. त्याचा मुलगा कुमारगिरी वेमा अज्ञान असल्यामुळे, दिवंगत राजाचा धाकटा भाऊ अना वेमा यानं बारा वर्षं राज्याचा कारभार सांभाळला. नंतर कुमारगिरी गादीवर आला. हा कवी वेमनाचा पिता होता हेच त्याच्या थोरवीचं एकमेव गमक म्हणावं लागेल. मल्लमा या राणीपासून त्याला तीन पुत्र झाले. वेमना हा त्यांचा सर्वात धाकटा मुलगा. अनावोता दुसरा ऊर्फ पेद्दा कोमटी वेमा आणि राचा वेमा ही इतर दोन भावांची नावं. अनुक्रमे या दोघांना राज्याभिषेक करण्यात आला. पहिला भाऊ १३९६ त, तर दुसरा भाऊ १४२४ मध्ये मृत्यू पावला. त्याच्याच एका सेनापतीनं राचा वेमाचा वध केल्यानंतर हे राजकुल संपुष्टात आलं. कोमटी वेमानं वर्तविलेल्या भविष्याप्रमाणे अलिया रेड्डीच्या कुलानं स. १३२८ ते १४२८ असं पूर्ण शंभर वर्षं राज्य केलं.

त्याच्या तीन मुलांपैकी वेमना हा सर्वात धाकटा आणि आनंदी, खेळकर वृत्तीचा मुलगा होता. त्याच्या शोकाकुल मात्यापित्यांनी बालपणी त्याला लाडात वाढवला. त्यामुळं तो पुढं पूर्णपणे बिघडला. पहिल्यापासूनच तो एक हट्टी व छांदिष्ट मुलगा होता; आणि तरुणपणीच तो रंगेल व व्यभिचारी बनला. मुक्तपणे अनेक स्त्रियांशी संबंध ठेवणं हा त्याचा छंद होता. लग्न झाल्यानंतर त्याच्यात सुधारणा होईल म्हणून त्याचे आईबाप त्याला लग्नाचा आग्रह करीत होते. परंतु कांहीतरी बारीकसारीक कारणांवरून त्यांनी सुचवलेली प्रत्येक सोयरीक तो नाकारीत असे. जिवंतपणी त्यानं

आपल्या आईवडिलांना अतोनात दु:ख दिलं, आणि त्यांच्या मृत्यूनंतर त्याच्यावरचा होतानव्हता तोही वचक नाहीसा झाला. त्याच्या दोन्ही भावांचा त्याच्यावर मुळीच धाक नव्हता. नाही म्हणायला त्याचा भाऊ महाराज राचा वेमा याची पत्नी राणी नरसंमाअंबा ही एकच व्यक्ती अशी होती की जिच्याबद्दल त्याच्या मनात थोडाबहुत आदर होता. हिच्याच प्रभावानं एकेकाळचा हा उन्मार्गगामी पुढे कवी, तत्त्वज्ञ झाला.

या परिवर्तनापूर्वी काही दिवस, वेमना एका देवदासीबरोबर राहत होता. ती त्याचं सर्वस्व हरण करीत होती. परंतु तो तिच्या मोहाच्या जाळ्यात असा फसला होता की, तिला प्रसन्न ठेवण्यासाठी तो काय वाट्टेल ते करायला तयार होत असे. एके दिवशी तिनं त्याला त्याच्या वहिनीचे—राणी नरसम्मा-अंबाचे सर्व अलंकार आणायला सांगितलं. त्या रत्नालंकारांनी तिला आपला साज-शृंगार करायचा होता. या मागणी-मुळं तो मोठ्या संकटात सापडला. देवदासीला त्याला नकारही देववत नव्हता आणि ही मानहानी करणारी तिची मागणी राणी नरसम्मा-अंबाच्या कानावर घालण्याचं धैर्यही त्याला होत नव्हतं. त्यामुळं दोन दिवस अन्नपाणी वर्ज्य करून राजवाड्यातच खिन्नपणे तो बसून राहिला. राणी नरसम्मा-अंबानं जेव्हा त्याला खोदखोदून त्या खिन्नतेचं कारण विचारलं, तेव्हा त्यानं तिला आपल्या खिन्नतेचं खरं कारण सांगितलं. तिनं एक नाकातली नथ सोडून घराण्यातले राज्यलक्ष्मीचे सर्व अलंकार त्याच्या स्वाधीन केले. वेमना ते अलंकार घेऊन धावत देवदासीकडे गेला. त्यात एक दागिना कमी आहे हे तिच्या तत्काळ लक्षात आलं आणि नाकातला तो अलंकार घेऊन येण्यासाठी त्याला पुन्हा राजवाड्यात पाठवलं. नरसम्मा-अंबाने तो राहिलेला दागिनाही त्याला दिला. पण देताना तिनं एक अट घातली. ती म्हणाली, 'हा दागिना कोणत्याही कारणानं सरळ देवदासीच्या हातात देऊ नये. तो तिच्या शयनमंदिराच्या दाराच्या उंबरठ्यावर ठेवावा आणि पाठीमागे वाकून, पाठीची कमान करून, आपल्या ओठाने तिनं तो दागिना उचलावा. असं करण्यापूर्वी तिनं पूर्णपणे नग्न व्हावं; आणि वेमनानं तिचा हा अंगविक्षेप टक लावून बघावा.' नृत्याचा एक भाग म्हणून पुष्कळ देवदासींना त्या काळी कसरतीचे असे प्रयोग सहज करता येत असत. तिनंही हा प्रयोग सहजपणे केला. पण तिच्या मुरडलेल्या कमानदार नग्न अंगाचं ते दृश्य त्याला इतके हिडीस व ओंगळ वाटलं, की त्याक्षणीच त्यानं अशी प्रतिज्ञा केली, की यापुढं कोणत्याही स्त्रीबरोबर लैंगिक संबंध ठेवायचा नाही.

त्याला बसलेला हा धक्का इतका जबरदस्त होता, की खिन्न, निराश, बेभान अवस्थेत तो बुडून गेला. त्यातून त्याला जाग आणण्यासाठी राणी नरसम्मा-अंबानं

राजघराण्यातल्या जवाहिराच्या कारखान्यावर देखरेख करण्याचं काम त्याच्यावर सोपवलं. आपल्या वहिनीविषयी त्याच्या मनात जो आदर होता, त्यामुळं त्यानं हे काम आनंदानं पत्करलं. इथं काम करीत असताना त्याला असं आढळलं, की अभिराम नावाचा एक सोनार कामावर उशीरा येतो. वारंवार सूचना देऊनही त्याच्यावर त्याचा काही परिणाम झाला नाही. तेव्हा त्यानं त्याला त्याच्या या अवज्ञेचं कारण स्पष्ट करण्याचा आग्रह केला. तेव्हा अभिरामनं असं सांगितलं की, या कामापेक्षा धार्मिक कर्तव्य त्याला फार महत्त्वाचं वाटतं आणि त्यामुळं, नेहमीकरिता नसलं तरी काही दिवसांपुरतं तरी त्याच्या उशीराकडे क्षमेच्या दृष्टीनं पाहावं. त्या कारागिराच्या या अवज्ञाकारक परंतु विनम्र व निश्चित उत्तरानं वेमनाचं कुतूहल अधिकच जागृत झालं आणि त्यानं या गोष्टीच्या तळाशी जाण्याचा निर्धार केला. दुसऱ्या दिवशी पहाटेच तो अभिरामच्या मागोमाग गुप्त रीतीनं त्याचा पाठलाग करीत निघाला. त्याला त्यानं एका गुहेत फळं आणि दूध घेऊन जाताना पाहिलं. एका झाडाचा आडोसा घेऊन त्यानं बघितलं, की अभिरामनं एका योग्यापुढं ती फळं आणि दूध ठेवलं आहे. बऱ्याच वेळानंतर त्या योग्यानं आपले डोळे उघडलेले पाहून वेमनाची उत्सुकता आणखी वाढली. लंबिका शिवयोगी हे त्या योग्याचं नाव. तो म्हणाला, " माझ्या प्रिय शिष्या, आपल्या भक्तीनं तू मला प्रसन्न करून घेतलं आहेस. उद्या मी हे ठिकाण सोडून जात आहे. अगदी उषःकाली तू ये. अध्यात्मविद्येतल्या समाधीयोगाची तुला दीक्षा देईन. त्याचबरोबर काही आधिदैविक शक्तींचंही वरदान तुला देईन. " हे शब्द ऐकताक्षणीच—उद्या सकाळी अभिराम ऐवजी स्वतःच त्या योग्याची कृपा संपादन करायची असा पूर्ण निश्चय करूनच वेमना राजवाड्यात परत आला.

परत येताच त्यानं राणी नरसम्मा अंबाची भेट घेतली आणि तिला अशी विनंती केली की, आज रात्रभर कारखान्यातच राहण्यासाठी अभिरामला आज्ञा करण्याच्या बाबतीत तिनं महाराजांचं मन वळवावं. महाराणीला एक नवा अलंकार ताबडतोब हवा आहे आणि त्याचं काम संपेपर्यंत त्यानं कारखान्याबाहेर पडू नये, असा आदेश त्याला देण्यात यावा, असं त्यानं तिला सांगितलं. त्याबरोबर त्यानं तिला असंही विनवलं की, कृपा करून या मागणीमागल्या आपल्या हेतूची चौकशी करू नये. तशी आज्ञा जारी करण्यात आली. अभिरामला योग्याकडं जाण्याच्या मार्गात अडथळा निर्माण झाला. ठरलेल्या वेळी अभिरामच्या जागी वेमना आला. तेव्हा त्याचं त्या योग्याला आश्चर्य वाटलं. पण वेमनानं त्या योग्याला साष्टांग प्रणिपात केला आणि तो त्याला नम्रपणे म्हणाला; "महाराज, अभिराम येऊ शकला नाही. आपल्याऐवजी त्यानं मला पाठवलं आहे;

आपले आशीर्वाद ग्रहण करण्यासाठी." आपल्यासमोर लोटांगण घातलेल्या त्या विनीत राजबिंड्या तरुणाला पाहून योगी प्रभावित झाला. व्यक्तित्वापेक्षाही त्याच्या उत्साहाचा योग्यावर अधिक परिणाम झाला. त्यानं आपले बाहू उंचावून त्याला आशीर्वाद दिला आणि म्हणाला, " ठीक आहे. तो बिचारा मात्र आयुष्यातल्या एका अमोल संधीला मुकला. माझ्या मुला, तू सुदैवी आहेस, ऊठ आणि दीक्षेचं ग्रहण कर."

एका क्षणात पूर्ण योग्यात त्याचं रूपांतर झाले. वेमना गुहेच्या बाहेर आला आणि सरळ अभिरामाकडे गेला. त्याच्यासमोर नतमस्तक होऊन त्यानं क्षमेची याचना केली. त्याच्या गालावरून पश्चात्तापाची आसवं ओघळत होती. तो म्हणाला, " मी तुझ्या हृदयावर फार मोठा आघात केला आहे. त्याच्या मोबदल्यात मी तुझं नाव अजरामर करीन ". आपल्या प्रत्येक कवितेच्या पालुपदात अभिरामाचं नाव घालून त्यानं आपल्या या प्रतिज्ञेची पूर्ती केली.

योग्याच्या रूपात त्यानं अनेक चमत्कार केले. त्यानं रानटी टरबुजांचं पीक काढलं. आपल्या भक्ताला प्रसाद म्हणून दिलेल्या टरबुजांत सोन्याच्या बिया निघत होत्या. परंतु त्याच्या बागेतून पळविलेल्या टरबुजांत किडे पडत होते. पुष्कळदा तो घरातच शौच करीत असे. तिरस्कारानं, या घाणेरडेपणाबद्दल त्याला कोणी हाकलून दिलं, तर त्या घरात कायमची दुर्गंधी पसरलेली राही. उलट जे कोणी श्रद्धेनं असे म्हणत की आपल्या या बालिश कृत्यानं या संतानं आपल्यावर अनुग्रह केला आहे, तर तत्काळ त्या घाणीचं सोन्यात रूपांतर होई. श्रद्धेनं ग्रहण केलेल्या त्याच्या मूत्राचंही सोन्याच्या पाण्यात रूपांतर होई.

आमचं बुद्धिनिष्ठ मन झोपेतदेखील या मलमूत्राची दुर्गंधी सहन करू शकत नाही. म्हणून याच ठिकाणाहून आपण दंतकथांच्या या अद्‌भुत जगातून बाहेर पडूया.

# मंद, लुकलुकते प्रकाशदीप

‘ आज हा अंधार मंद व लुकलुकत्या दीपज्योतींनी उजळला आहे. ’

— ए. जी. गार्डिनर

आपला पोकळपणा लपवण्यासाठी ह्या दंतकथा इतिहासाचा मुखवटा चढवतात. पण हे मुखवटे इतके झिरझिरीत असतात की त्यांचा पोकळपणा त्यांतूनही स्पष्ट दिसतो. वेमनाविषयीच्या दंतकथा यांचं उत्तम उदाहरण म्हणता येईल. त्या कथा तारखांचे खोटे प्रदर्शन करतात; एखाद्या राजकुलाशी आपलं नातं जोडतात. परंतु चिकित्सक संशोधनासमोर त्यांचा टिकाव लागत नाही.

आजदेखील रेड्डी जातीत ‘ वेमा ’ अथवा ‘ वेमना ’ हे नाव सामान्यतः कुठं आढळत नाही. परंतु तटवर्ती आंध्र प्रदेशावर एका शतकापर्यंत राज्य करणारे रेड्डी घराण्यातले सारेच पुरुष ‘ वेमा ’ होते. त्याचप्रमाणे हा कवीही एक वेमा होता. ह्यावरून असं दिसतं की, हा कवी राजकुलातला असावा. तसा तो नसला, तरी राज-कुलाशी त्याचा संबंध जोडला गेल्यानंतर त्याला राजघराण्यातील राजपुत्राचा दर्जा देण्यात आला असावा. ह्यावरून वस्तुस्थिती एवढीच दिसून येते,– की कवीचं नाव व राजकुलातील पुरुषाचं नाव सारखं असल्यामुळे त्या नावाभोवती आवश्यक अस-लेल्या ऐतिहासिकतेची शक्यता निर्माण केली गेली. ह्याबरोबरच दुसरीही एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की रेड्डी घराण्यातले काही राजे प्रख्यात कवी, पंडित व भाष्यकार होते. त्यामुळे या संबंधाला अधिक बळकटी आलेली दिसते.

परंतु ह्या रेड्डी घराण्यातल्या राजांच्या नावाच्या मागे कोमटी शब्द कसा जोडण्यात आला, हा एक प्रश्नच आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणे तेलुगु भाषेत कोमटी हा ‘ वैश्य ’ या शब्दाचा समानार्थी शब्द आहे. हिंदु वर्णव्यवस्थेत वैश्य या वर्णाला तिसरं स्थान आहे. रेड्डी हे शूद्र आहेत, म्हणजे वर्णव्यवस्थेत त्यांचं स्थान चौथं म्हणजे आणखी खालचं आहे. मग रेड्डी हे देखील कोमटी आहेत या विधानातील विसंगती कशी दूर करता येईल ? त्याखेरीज शेतकऱ्यांच्या जातीतलं एक अप्रसिद्ध रेड्डी घराणं एकदम संपन्न आणि सत्ताधारी कसं बनलं ? कोमटी वेमा आणि त्याची पारसजलाची दोन मडकी, यांची दंतकथा निर्माण करून या दोन्ही प्रश्नांना बगल देता येईल अशी त्याच्या जनकांची कदाचित् कल्पना असावी.

नुकतंच जे ऐतिहासिक आणि वाङ्मयीन संशोधन झालं आहे त्यानं या दंतकथांचा सर्व आधारच नष्ट झाला आहे. या संशोधनात असं आढळून आलं आहे की रेड्डी राजांच्या घराण्याचं नाव ' दोंती ' नसून ' दासती ' होते. प्रोलय्या वेमापूर्वी त्याच्या पित्याच्या नावातही वेमा हे नाव होतं, तसंच या प्रोलय्या वेमाची राजधानी कोंडावीडू नसून अडंकी होती. प्रोलय्या वेमानंतर राज्यावर आलेल्या आनावोता वेमानं काही काळ राज्य केल्यावर अडंकीची राजधानी हलवून कोंडावीडूला नेली. शिवाय हा आनावोता वेमा प्रोलय्याचा भाऊ नसून मुलगा होता. त्याचप्रमाणे कुमारगिरी वेमानंतर सिंहासनावर बसलेला राजा पेद्दा कोमटी वेमा हा त्याचा मुलगा नव्हता, पुतण्या होता. शेवटचा मुद्दा म्हणजे या घराण्यातला शेवटचा राजा, राचा वेमा हा पेद्दा कोमटी वेमाचा भाऊ नसून मुलगाच होता. परंतु या सर्व विधानांवरून वेमना हा राजपुत्र नव्हता हे कसं सिद्ध होतं असा कोणी प्रश्न केला, तर त्याचं उत्तर फार सोपं आहे. दंतकथेत असं म्हटलं आहे की वेमना हा राजा कुमारगिरी वेमा याचा तिसरा आणि शेवटचा पुत्र होता. पण इतिहासावरून असं सिद्ध होतं की, या राजाला तीन नव्हे तर फक्त एकच मुलगा होता आणि तोही तरुणपणीच वारला.

दंतकथांचा मूळ आधार खणून काढणं तसं सोपं आहे. परंतु वेमनाच्या चरित्राची सामग्री जुळवण्याचं काम मात्र अशक्य नसलं तरी कठीण आहे. सी. पी. ब्राऊन या विद्वानानं सर्वप्रथम हा प्रयत्न केला. — आमच्यापेक्षा तुलनेनं, अधिक अनुकूल अशा काळात, (कारण तो आमच्यापेक्षा दीड शतकानं वेमनाच्या जवळ होता) त्यानं उत्साहानं संशोधन करण्याचा प्रयत्न केला पण विशेष यश त्याच्या पदरात पडलं नाही. भाषांतरासह आणि टिपांसह संपादित केलेल्या आणि १८२९ साली प्रसिद्ध केलेल्या, ' वेमनाच्या कविता : धार्मिक, नैतिक आणि उपहासात्मक ' या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत ब्राऊन लिहितो —

" जन्माने तो कापू अथवा शेतकरी होता. काहीजण असं सांगतात की कंडानूल (कर्नूल) प्रदेशातील, अन्ना वेमा रेड्डी या सरदाराच्या कुलात तो जन्मला होता आणि या कवीचा भाऊ गंडीकोटा या किल्ल्याचा किल्लेदार होता.

या उलट कांहीजण असं सांगतात की, तो कंडानूल जिल्ह्यातील क्रिष्टीपाद या गावचा राहणारा होता, तर दुसरे असं म्हणतात की, गुंटूर जिल्ह्यातील इनाकोंडा या गावात तो राहत असे. माझ्या ऐकण्यात असंही आलं आहे, की तो कडप्पा जिल्ह्यातील चिटवेल या गावी जन्मला. या सर्व ठिकाणी जाऊन चौकशी करण्याची संधी मला मिळाली. परंतु कुठंच काही माहिती मिळाली नाही. परंतु त्याच्या काही कवितांतल्या बोलीवरून असं वाटतं, की वेमना हा कदाचित तेलंगण प्रदेशातील नैऋत्येकडील विभागातला असावा; आणि (याआधी उल्लेखिलेली) ही गावं

याच विभागातली आहेत. ख्रिस्ती शतकाच्या सतराव्या शतकाच्या आरंभी तो होऊन गेला असं मानण्यात येतं. ''

ब्राऊननं संग्रहीत केलेल्या, परंतु प्रकाशित न केलेल्या अनुवादित कवितांच्या मोठ्या ग्रंथांत*, (कदाचित त्याला या अनुवादाच्या गुणवत्तेबद्दल शंका असावी) त्यानं काहीशी निश्चित विधानं केलेली दिसतात. त्यात तो निःसंदिग्धपणे असं लिहितो- की वेमना हा गंडीकोटाच्या परिसरात जन्मला. तो पुढे असंही विधान करतो, की त्याच्या कवितेतल्या अंतर्गत पुराव्यावरून या तर्कनिष्ठ निर्णयाला आपण येतो की सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात वेमनानं कवितालेखन केलं आणि अठराव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत तो जिवंत होता. यावरून असं दिसून येतं की, ब्राऊनचं पहिलं मत असं होतं की, वेमना हा सतराव्या शतकाच्या प्रथमार्धात नव्हे तर उत्तरार्धात होऊन गेला.

परंतु नंतर ब्राऊन आपल्या या पहिल्या विधानाबद्दल साशंक बनतो आणि वेमना हा पंधराव्या शतकात होऊन गेला असावा असं मत व्यक्त करतो. ' वेमनाच्या कविता : नैतिक, धार्मिक आणि उपहासात्मक ' या संग्रहाची दुसरी आवृत्ती त्यानं १८३९ साली प्रसिद्ध केली. या ग्रंथाच्या प्रती दुर्मिळ आहेत. आंध्र प्रदेशातल्या सार्वजनिक किंवा खाजगी अशा कुठल्याही ग्रंथालयात या पुस्तकाची प्रत मिळत नाही. परंतु मेजर मॅकडोनाल्ड याच्या लिखाणामधून त्याचा काही तपशील आपल्याला मिळू शकतो. " या आवृत्तीत . . . ." तो म्हणतो, " अनुवाद व टिपा गाळण्यात आल्या आहेत. परंतु नैतिक व धार्मिक विभागात पुष्कळच नवीन कवितांची भर टाकण्यात आली आहे. " पहिल्या आवृत्तीत फक्त ६९८ कविता होत्या, पण दुसऱ्या आवृत्तीतल्या कवितांची संख्या ११६३ पर्यंत गेली होती. ह्या बाबतीत पुन्हा मॅकडोनाल्डचाच आधार घेतला पाहिजे. मि. मॅकडोनाल्ड म्हणतो, " मि. ब्राऊनच्या म्हणण्याप्रमाणे सामान्यतः असं मानण्यात येतं की, वेमनाचं साहित्य हे चारशे वर्षांपूर्वी लिहिलेलं प्राचीन साहित्य आहे. पुढे त्याला अशीही पुस्ती तो जोडतो की, तेलुगु बसव पुराणाच्या कर्त्याचा तो समकालीन होता. हे जंगमांचं मत खरं असेल तर त्याचा काळ अजून मागं जाईल. मि. ब्राऊनच्या पहिल्या विधानाप्रमाणं वेमना हा बेकन व शेक्सपियरचा समकालीन मानावा लागतो आणि दुसरं मत ग्राह्य मानलं तर चॉसरचा तो समकालीन ठरतो. ही दोन्ही विधानं अमान्य करून मॅकडोनाल्डनं

---

*सन १९६७ साली, आंध्र प्रदेश साहित्य अकादमी (हैद्राबाद) या संस्थेनं हा ग्रंथ प्रसिद्ध केला. ह्यात वेमनाची १२१५ पद्यं इंग्रजी अनुवादासह संग्रहित करण्यात आली आहेत.

स्वतःच्या संशोधनाच्या आधारावर स्वतंत्रपणे असं मत मांडलं आहे की, वेमना हा सतराव्या शतकाच्या मध्यात जन्मला होता.

वेमनाच्या काळाविषयी गोव्हरचं मत आणखी वेगळं आहे. तो म्हणतो :

" वेमनाच्या कवितांत मुसलमानी धर्माचा किंवा मुसलमानांचा कुठंच उल्लेख आढळत नाही आणि शैलीच्या व विचारांच्या दृष्टीनं दहाव्या शतकातील तमिळ कवींशी त्याचं साम्य दिसून येतं. यावरून असं सुचवावंसं वाटतं की, वेमनाचा काळ बाराव्या शतकानंतरचा मानता येणार नाही. "

गोव्हरनं जर, ब्राऊननं प्रसिद्ध केलेली वेमनाच्या काव्यसंग्रहाची दुसरी आवृत्ती पाहिली असती तर त्यानं आपल्या विधानाच्या पुष्ठयर्थ ब्राऊनचा निश्चित आधार घेतला असता. ते कसंही असो, वेमनाच्या कवितेत मुसलमानी धर्माचा उल्लेख नाही हे गोव्हरचं विधान मात्र चुकीचं आहे. वेमनाच्या काव्यात तीन ठिकाणी मुसलमानांचा उल्लेख आला आहे.

कॅम्बेलचा मात्र गोव्हरच्या मताला विरोध आहे आणि त्याची विधानं काहीशी अस्पष्ट असली, तरी तो सर्वसाधारणपणे मॅकडोनाल्डच्या मताशी सहमत आहे. त्यानं सोळाव्या शतकाचा मध्य हा वेमनाचा काळ गृहित धरला आहे. "सामान्यतः असं मानण्यात येतं. . . . . . ." तो म्हणतो, " की तो (वेमना) २५० वर्षांपूर्वी होऊन गेला. " वेमनाच्या जन्मग्रामाविषयी त्याचं मत निश्चित नाही. तो म्हणतो–

" अनेक स्थळांचा त्याच्या जन्मग्रामाच्या बहुमानावर हक्क सांगितला जातो. पण ही गोष्ट अशक्य आहे. माझ्या मतें मद्रासच्या उत्तरेला दोनशे मैलांच्या अंतरावर कडप्पा जिल्ह्यातल्या डोंगराळ व घनदाट जंगलाच्या प्रदेशात कुठेतरी तो जन्मला असावा. कडप्पा आणि त्याच्या थोड्याबहुत उत्तरेला असलेला कर्नूलचा परिसर हाच भाग निःसंशय त्याची कर्मभूमी असली पाहिजे. कडप्पाच्या नैऋत्य टोकाला असलेल्या कत्रापल्ली या लहानशा गावात त्याचं घर असलं पाहिजे, असा स्थानिक परंपरागत समजही आहे. त्या गावात त्याच्या घराण्याचं एक घर आहे आणि त्या घरात राहाणारे, त्या कवीचे वंशज या नात्यानं, त्याच्या भक्तांकडून येणाऱ्या दानाचा स्वीकारही करतात, ही गोष्ट सत्य आहे."

कॅम्बेल हा एक परिश्रमी संशोधक आहे. परंपरागत समजुतीप्रमाणे कत्रापल्ली या गावात, वेमना यानं आपल्या आयुष्याचे अखेरचे दिवस घालवले आणि तिथंच तो मृत्यू पावला, ही गोष्ट त्याला समजताच त्यानं त्या गावाला भेट दिली. तिथं त्यानं वेमनाच्या समाधीचं दर्शन घेतलं आणि स्वतःला वेमनाचा वंशज म्हणवणाऱ्या तिथल्या व्यवस्थापकाशी भाषणही केलं. त्या समाधीशेजारी देवळात उभा असलेला

वेमनाचा ' हिडीस लाकडी पुतळा'ही त्यानं बघितला. तसंच ' वेमना हा आमचा देव आहे आणि आम्ही त्याची पूजा करतो ' अशी कबुली देणाऱ्या काही लोकांचीही त्यानं भेट घेतली. तिथून परतल्यावर तिथं जे जे पाहाण्यात व ऐकण्यात आलं, त्याची त्यानं आपल्या प्रौढ सुंदर भाषेत नोंद करून ठेवली आहे.

वेमनाला आपला पूर्वज मानणाऱ्या कत्रापल्लीच्या कुटुंबांच्या संग्रहीं ' वेमना चरितमु ' (वेमनाचं चरित्र) आहे ही गोष्ट कोणी कॅम्बेलच्या नजरेस आणली नाही तरी ताडपत्रांवर लिहिलेलं आणि फाटक्या–तुटक्या अवस्थेतलं एक हस्तलिखित सापडलं आहे. त्याची एक प्रत फक्त, काकीनाडा येथील आंध्र साहित्य परिषदेच्या कार्यालयात उपलब्ध आहे. त्याचा अभ्यास केल्यावर असं आढळून आलं की, ' वेमना चरितमु ' या हस्तलिखिताचं अलीकडेच म्हणजे १८४५ मध्ये संकलन करण्यात आलं आहे. ' वेमना योगींद्र चरितमु ' या ग्रंथात एकत्रित केलेल्या दंतकथांपेक्षाही विलक्षण व हास्यास्पद कथा त्यात आहेत. त्याशिवाय या ग्रंथात ज्या थोड्या चरित्र-विषयक नोंदी आढळतात, त्या तुंगा वेमा या नावानं प्रसिद्ध असलेल्या दुसऱ्याच एका वेमासंबंधीच्या आहेत. तुंगा वेमा यानं लिहिलेल्या शंभर कवितांचाही त्यात संग्रह करण्यात आला आहे.

ह्या पाश्चात्य विद्वान संशोधकानंतर बऱ्याच वर्षांनी या विषयावर लेखन करणाऱ्या ग्रियर्सन या संशोधकानं असं मत व्यक्त केलं आहे की, वेमना हा सोळाव्या शतकातला कवी असला पाहिजे. त्याचं हे विधान देखील ऐकीव माहितीवरच आधारलेलं आहे.

ज्यांनी आपली विश्लेषणात्मक दृष्टी वेमनावर केंद्रित केली, ते पहिले विद्वान संशोधक होते के. व्ही. लक्ष्मणराव. खरोखरच आंध्र प्रदेशात इतिहास व वाङमय यांचं सशोधन करणाऱ्या मंडळीतले ते एक आघाडीचे संशोधक होते. त्यांचं अनुकरण करून इतर काही विद्वानांनीही त्यानंतर वेमनावर आपलं लक्ष केंद्रित केलं. ह्यांपैकी वांगुडी सुब्बाराव, रालापल्ली अनंतकृष्णा शर्मा, ' जुळे कवी ' या नावाने ओळखले जाणारे शेषाद्री रामन्ना कवुलु, वेत्तुरी प्रभाकर शास्त्री, बंदारू तमय्या, चगंती शेषय्या आणि वेद वेंकट कृष्णा शर्मा हे संशोधक महत्त्वाचे आहेत. ह्या सर्वांनी, आपापल्या परीनं वेमनाच्या जीवनावर प्रकाश टाकण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला आहे. परंतु हे सारे मंद आणि लुकलुकता अस्पष्ट प्रकाश टाकणारेच दीप होते. या संशोधकांनी संपूर्ण आंध्र प्रदेशच वेमनाचं जन्मस्थान करून टाकला आहे आणि पंधरा ते अठरा यातलं प्रत्येक शतक म्हणजे वेमनाचा काळ असं गृहीत धरून चारही शतकांतून त्याला फिरवून आणला आहे !

आतापर्यंत, तेलुगु अभ्यासकांत वांगुडी सुब्बाराव आणि रालापल्ली अनंतकृष्णा शर्मा या दोन विद्वानांनी वेमनाचा अभ्यास सविस्तरपणे आणि तर्कनिष्ठ व शास्त्रशुद्ध रितीनं केला आहे. पहिल्या विद्वान लेखकानं वेमनाचं चिकित्सक चरित्र १९२२ साली प्रसिद्ध केलं आहे आणि दुसऱ्यानं, आंध्र विद्यापीठ या संस्थेतर्फे दरवर्षी होणाऱ्या सर रघुपती वेंकटरत्नम् स्मारक व्याख्यानमालेत वेमना हा आपल्या व्याख्यानाचा विषय निवडला होता. ही व्याख्यानं त्यांनी वाल्टेर येथे १९२८ साली दिली. वेमनावर लिहिणाऱ्या सर्व लेखकांत या दोघांची मतं भिन्न आहेत; विशेषतः वेमनाच्या काला-संबंधी त्यांची मतं परस्परविरोधी आहेत.

वांगुडी यांच्या मताप्रमाणं वेमना पंधराव्या शतकाच्या सुरवातीला जन्मला आणि तो श्रीनाथाचा समकालीन होता. वांगुडीनं आपल्या या निष्कर्षासाठी लक्ष्मण-रावाचा आधार घेतला आहे. तसंच मध्ययुगीन काळातील कवींनी 'वेमा'बद्दल जे उल्लेख केले आहेत त्यावर त्यानं वाजवीपेक्षा अधिक भर दिला आहे. हा पुरावा टिकण्यासारखा नाही. चालू शतकाच्या दुसऱ्या दशकापासून तेलुगु पंडितांनी वेमना-कडं लक्ष देण्यास सुरुवात केली आहे, हे आपण पाहिलंच आहे. त्यापूर्वी त्याच्याकडं दुर्लक्ष करण्यात आलं किंवा दुर्लक्षित करण्यायोग्यतेचाच हा कवि आहे, असं मानून, त्याला 'हातावेगळं' करण्यात आलं. अशी वस्तुस्थिती असल्यामुळं कुठल्याही प्राचीन कवींनी आणि त्यापेक्षाही तुरगा राम कवी आणि एडापट्टी येरीप्रगादा यांच्या-सारख्या विद्वान कवींनी त्याचा उल्लेख आदरानं केला असेल, हे संभवनीय नाही. कोंडावीडू आणि राजमहेन्द्री येथले रेड्डी राजे स्वतःला वेमा म्हणवीत असत. ते विद्येचे उदार आश्रयदाते होते. त्यांच्यापैकी काही स्वतः प्रसिद्ध कवी होते. त्यामुळं 'पूर्वकविस्तुती' मध्ये जो वेमाचा उल्लेख आला असेल तो या राजघराण्यातील कवींना व पंडितांना अनुलक्षून असण्याचाच अधिक संभव आहे.

वांगुडी हा वेमनाचा काळ शक्य तितका मागे नेण्याचा प्रयत्न करतो, तर रालापल्लीची प्रवृत्ती त्याचा काळ अलीकडे ओढण्याकडे दिसते. रालापल्लीच्या मताप्रमाणे वेमना हा अठराव्या शतकातला कवी आहे. बिनतोड पुराव्याच्या अभावी वेमनाच्या जन्माच्या व मृत्यूच्या तारखांबद्दल निश्चितपणे सांगणं साहसाचं ठरेल, तरी पण ब्राऊननं दिलेल्या वेमनाच्या तारखा — जन्म (१६५२), मृत्यू (अठराव्या शतकाचे पहिलं दशक) बहुधा बरोबर असाव्यात.

वेमनाच्या जन्मस्थानाविषयी, वांगुडी, वेमनाच्या काव्यातील अंतर्गत पुराव्या-वर विसंबून, त्याचं कोंडावीडू हेच जन्मस्थान आहे असं निश्चितपणे सांगतो. राला-पल्ली म्हणतो की, जोपर्यंत दुसरा काही विरोधी पुरावा समोर येत नाही, तोपर्यंत कोंडावीडू हेच त्याचं जन्मग्राम होतं असं मानायला हरकत नाही. ह्याच एका मुद्यावर

दोघांच्या मतांत फारसा विरोध आढळून येत नाही. परंतु इतर काही जणांचं मत असं आहे की वेमनाचं बालपण कोंडावीडू इथं गेलं हे खरं असलं, तरी त्याचा जन्म मात्र मूगचित्तापल्ली या गावात झाला. वेमना लहान असताना त्याचे आईवडील कोंडावीडू येथे येऊन राहिले. ह्या चर्चेचा समारोप करताना थोडक्यात असं म्हणता येईल की रालापल्लीचं मत असं आहे की वेमनाचा जन्म कुठंही झालेला असो, त्यानं आपल्या आयुष्याचा महत्त्वाचा काळ, आता रायलसीमा या नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशातील कडप्पा आणि कर्नूल या दोन जिल्ह्यांत घालविला आहे.

वादाचा दुसरा मुद्दा वेमनाच्या जातीसंबंधानं आहे. रालापल्लीचं म्हणणं असं आहे की वेमना हा कापू होता. या उलट, वांगुडी असं निश्चित विधान करतो की तो जातीने रेड्डी होता. याबाबतीत दोघांनीही वेमनाचीच साक्ष काढली आहे. वेमनानं या दोघांही वादी-प्रतिवादींच्या मतांना मान्यता देऊन त्या दोघांनाही समाधान मिळेल अशी व्यवस्था केली आहे. एका ठिकाणी तो स्वतःस कापू म्हणवून घेतो तर दुसऱ्या ठिकाणी तो स्वतःला रेड्डी म्हणवितो. वेमनाचे हे उद्गार दुटप्पी आहेत असे म्हणता येणार नाही. कारण तो कापू आणि रेड्डी दोन्हीही आहे. अगदी अलीकडच्या काळापर्यंत, बहुधा चालू शतकाच्या सुरवातीपर्यंत, रेड्डी आणि कापू हे दोन्ही शब्द पर्यायी मानण्यात येत होते. उदाहरणार्थ, एडगर थर्स्टन यांनी १९०९ साली प्रसिद्ध केलेल्या 'दक्षिण भारतातील जाती व जमाती' ( CASTES AND TRIBES OF SOUTHERN INDIA ) या आपल्या ग्रंथात रेड्डी या शब्दाची वेगळी नोंद केलेली नाही. 'कापू' या शब्दाखाली रेड्डींचा परंपरागत इतिहास, त्यांचे रीतिरिवाज व रूढी याबद्दल एक विस्तृत निबंध त्यानं जोडला आहे. त्यात 'रेड्डी' आणि 'कापू' हे शब्द समान अर्थानं वापरण्यात आले आहेत. ब्राऊनच्या तेलुगु-इंग्रजी कोशात 'कापू' या शब्दाचा अर्थ कुळ अथवा रयत भूधारक शेतकरी, ग्रामीण माणूस, गाववाला, प्रजा, व्यक्ती, भाडेकरू इ. असा दिला आहे. या सर्व अर्थांपैकी, सर्वसामान्यपणे शेतकरी या अर्थानं हा शब्द अधिक प्रचारात आहे. सध्या 'रयत' या शब्दाचा शेतकरी या अर्थानं अतिरिक्त वापर करण्यात येतो. परंतु तो तेलुगु शब्दच नाही. तो मूळ उर्दू शब्द असून, त्याच्या लेखनात (उच्चारात) किंचित् फरक करण्यात आला आहे. अगदी अलीकडंच कापू या शब्दालाही, संपूर्णपणे नसला तरी मुख्यत्त्वे जातिवाचक अर्थ प्राप्त झाला आहे. म्हणून वेमना हा कापू आणि रेड्डी दोन्हीही होता असं मानायला आपल्याला काही हरकत नसावी. अगदी काटेकोर, निश्चित विधानच हवं असा आग्रह असेल तर वेमना हा रेड्डी-कापू होता असे म्हणता येईल. – म्हणजे तो जातीने रेड्डी होता पण त्याचा व्यवसाय शेतकऱ्याचा होता.

वेमना कुठल्या गावी मृत्यू पावला, याबाबतीत देखील वांगुडी आणि रालापल्ली यांच्यात मतभेद आहेत. वांगुडीचं मत असं आहे की वेमनानं आपले अखेरचे दिवस कत्रापल्ली येथे व्यथित केले आणि तेथेच तो मरण पावला. तो स्पष्टपणे तसं सांगत नाही, पण कत्रापल्ली येथे असलेली समाधी वेमनाची आहे असं तो गृहीत धरतो. हे विधान रालापल्लीला शंकास्पद वाटतं. कॅंबेलप्रमाणे त्यानंही कत्रापल्लीला एकदा भेट दिली आहे. ही घटना चाळीस वर्षांपूर्वीची आहे. आंध्र विद्यापीठात वेमनावर द्यावयाच्या व्याख्यानमालेसाठी सामग्री जमवत असताना, तो या गावालाही गेला होता. त्यावेळी बदलीवर आलेल्या पुजाऱ्यानं, रालापल्लीजवळील ते देऊळ व ती समाधी यांचा वेमनाशी जोडलेला संबंध बनावट, खोटा व एक ढोंग आहे हे कबूल केलं होतं, असं रालापल्ली म्हणतो. म्हणून रालापल्लीनं असं मत आग्रहानं मांडलं आहे की वेमनाचा मृत्यू कत्रापल्लीत झाला नाही, तर रायलसीमा प्रांतातल्या दुसऱ्या कुठल्यातरी गावी झाला असावा. या संदर्भात तो वेत्तुरी प्रभाकर शास्त्री यांनी सांगितलेल्या आद्य शंकराचार्यासंबंधीच्या प्रथेचा उल्लेख करतो आणि शंकराचार्या-माणे वेमनानंदेखील गुहेत शिरून आपल्या पार्थिव देहाचा त्याग केला असावा असं सुचवितो. वेमनाच्या काही शिष्यांच्या माहितीप्रमाणे ही गुहा कडप्पा जिल्ह्या-तील पामूर या खेड्यात आहे.

या सर्व गोष्टी वादाचा विषय आहेत, आणि हे चर्चासत्र, संशोधक स्वतःच थकून थांबवणार नाहीत, तोपर्यंत असंच चालू राहाणार.

* * *

# तोही मानवच होता

' तो मानवच होता, पूर्ण समजून घ्या त्याला
कोणीही दिसत नाही मला दुसरा, त्याच्यासमान '

चरित्रलेखकाला ज्यांच्याशिवाय पाऊल टाकणं अशक्य होतं, उदाहरणार्थ—जन्म-तारीख, जन्मस्थळ, बापाचं नाव, आईचं नाव इत्यादी, असा तपशील बाजूस सारून आपण वाट काढीत पुढं गेलो, तर त्याच्या कवितेच्या अंतर्गत पुराव्याच्या आधारावर, आपल्याला वेमनाच्या चरित्राची पुनर्रचना करता येईल. तो खरा जीवनाचा उद्-गायक होता. जीवन त्याला प्रत्यक्ष माहीत होतं. त्याचा त्याला जिवंत, ताजा असा अनुभव होता. त्यानं जीवनाशी थट्टा-विनोद केला, त्याचा उपहास केला, त्याला हास्यास्पदही ठरवलं; आणि त्याच्याबरोबर खळखळून तो हसला. जीवनाबरोबर त्यानं दीर्घ सुस्कारे टाकले, त्याची दुःखं सोसली आणि त्याच्याबरोबर अश्रूही ढाळले. त्यानं जीवनाशी संघर्षही केला. कधी जिंकला, तर कधी हरला. परंतु एक मात्र खरं की सर्व काळी आणि सर्व प्रसंगी त्यानं जगण्यातला आनंद मनमुराद लुटला; कारण त्याच्या दृष्टीनं जीवन म्हणजे एक सत्याचा प्रयोग होता, (नव्या जगाचा) शोध घेणारं एक समुद्रपर्यटन होतं. जीवनाविषयीची त्याची आसक्ती इतकी उत्कट व विशाल होती. म्हणूनच आपल्या कवितेत स्वतःच्या तसंच सामान्य माणसाच्या जीवनाचं दर्शन त्याला घडविता आलं. एखाद्या वैशिष्ट्यपूर्ण उक्तीत कुठं त्याच्या स्वतःच्या जीवनाची झलक दिसते, तर कुठे एखादा पारदर्शी विचार आढळतो. तर आणखी कुठं, एखाद्या व्यक्तिरेखेतलं कुणाचं विलक्षण जिवंत साम्य आपलं लक्ष वेधून घेतं. त्याच्या आवडत्या पूर्वग्रहांत आणि त्याच्या खास आवडी-निवडींत आपल्याला त्याचं दर्शन घडतं. त्याच्या प्रेमभावनेत, द्वेषमत्सरात आणि त्याच्या व्यथा-यातनांत विखुरलेले तुकडे एकत्र करून त्याच्या अनुभवांचं एक संपूर्ण चित्र पूर्णपणे तयार करता येतं. फक्त आपण आपले डोळे उघडे ठेवून, तत्पर मनानं त्याच्या दोन ओळींमधला अर्थ शोधला पाहिजे. एवढं आपल्याला करता आलं, तर एका थोर आत्मसाक्षात्कारी कवीची आपल्याला ओळख पटेल.

आपल्या कवितेत त्यानं स्वतःचं जें चित्र रेखाटलं आहे, त्यावरून हे उघड होतं की, तो कुणा राजघराण्याचा कुलदीपक नाही. त्याच्या आयुष्याची पार्श्वभूमी,

राजवाड्याची नसून शेतीवाडीची आहे. हे शेतही फार मोठं नाही. पण एखाद्या कुटुंबाला सुखात राहायला पुरेसं आहे. शिक्षण संपल्यावर ( हे शिक्षण वरवरचं नावापुरतं होतं) वेमनानं आपल्या वडीलांना शेतीवाडीच्या कामावर मदत करायला सुरुवात केली. रोज सकाळी तो गाई-म्हशींना रानात चारायला नेत असे आणि संध्याकाळी त्यांना परत आणीत असे. नांगरणी, पेरणी व खुरपणीच्या कामांतही तो वडिलांना साह्य करीत असे. शेतं खळ्याला आली म्हणजे उंच माळ्यावर उभं राहून आणि हातात गोफण घेऊन पांखरांना तो उडवून लावीत असे आणि पिकांची राखण करीत असे. कापणी, मळणी आणि धान्य सफाईच्या कामांतही वडिलांना तो हातभार लावीत असे. नंतर मोठ्या अभिमानानं बैलगाडीवर बसून प्रत्येक सुगीत तयार झालेलं पीक तो घरी आणीत असे. कोणतंही काम असो, तो ते आनंदाने करीत असे. काम करताना तो गात असे. लोकगीतं तर तो उत्तम तऱ्हेनं गात असे. उघड्यावर होणारी नाटकं, कठपुतळ्यांचा खेळ आणि मंदिरात होणारी रामायण-महाभारताची गायनं तो कधी चुकवीत नसे. या महाकाव्याचे काही भाग त्यानं मुखोद्गत केले होते.

परंतु या कामांपेक्षा, समवयस्क, घष्टपुष्ट व उत्साही मुलांची संगत त्याला फार प्रिय होती. पुष्कळदा तो शेतीची कामं चुकवून या मुलांबरोबर खेळण्यात, गावातील विहिरीत पोहण्यात किंवा डोंगर-रानांत मुलांबरोबर भटकण्यात घालवीत असे. उच्च वर्णीयांचे ढोंग त्याला मुळीच पसंत नसे. तो सर्व जातीपातीच्या मुलांत मुक्तपणे मिसळायचा. पशु-पक्ष्यांची त्याला आवड होती. कावळा आणि घुबड हे पक्षी मात्र त्याला आवडत नसत. तसंच, कुत्रा, डुकरं आणि गाढवं या जनावरांचाही तो तिरस्कार करी. बोलण्यात मोकळा, निर्णयात चपळ आणि कृतीत धीट, असा तो पूर्ण बहिर्मुख वृत्तीचा माणूस होता. वैयक्तिक अपमान किंवा सामाजिक अन्याय त्याला मुळीच सहन होत नसत. गावातल्या पुंड मुलांशी त्याचे नेहमीच खटके उडत. जेव्हा तो एखादा पक्ष घेत असे, तेव्हा तो त्याच्यासाठी अखेरपर्यंत लढत असे. त्याचा हा उत्साह त्याच्या वडिलांना बेफामपणा, अविचार वाटत होता.

वेमना आपल्या आईवडिलांवर प्रेम करीत असे, त्यांचा आदर करीत असे. तो आपल्या आईचा फार लाडका होता. तीही त्याचं कौतुक करीत असे. दूध, दही, तूप भरपूर असलेलं सुग्रास जेवण त्याला भरपूर आवडतं हे तिला माहीत असल्यामुळं हे पदार्थ ती त्याला मोकळ्या हातानं वाढीत असे. त्याच्या उनाडपणाबद्दल त्याचे वडील जेव्हा तिच्याजवळ तक्रार करीत, तेव्हा काहीतरी कारण सांगून एकीकडं ती त्यांची समजूत घाली तर दुसरीकडं खाजगीत उगीच नसत्या भानगडीत पडू

नकोस म्हणून ती त्याच्या विनवण्या करी. त्याच्या किशोरवयाचा सुरुवातीचा काळ निष्काळजीपणात आणि सुखात गेला. पुढे त्याची आई अकस्मात वारली आणि त्याला दुःखाचा तीव्र धक्का बसला. त्याच्या भोवती चोहीकडं अंधार पसरला; त्याला एकाकी, निराधार वाटू लागलं.

वेमना या खोल आणि तीव्र दुःखातून सावरण्यापूर्वीच त्याच्या वडिलांनी दुसरं लग्न केलं. आपल्या वडिलांनी विधुर राहावं अशी त्याची अपेक्षा नव्हती. ' पण अशी विपरीत घाई का केली त्यांनी ?' तो आपल्याशीच विचार करू लागला, ' माझ्या आईवर त्यांचं खरंखुरं प्रेम नव्हतं का ? दुसऱ्या तरुण स्त्रीशी विवाह करता यावा यासाठी ते तिच्या मरणाचीच वाट पाहत होते का ? ' या दुष्ट व निर्दय विचारांतून वेमना स्वतःची सुटका करून घेऊ पहात होता. पण ते विचार सारखा त्याचा पाठलाग करीत होते आणि तो दुःख-संतापाच्या लाटेत सारखा खोल खोल बुडत होता.

वेमनाला असा अबोल आणि खिन्न बघून व त्याची तुटक वृत्ती पाहून त्याच्या सावत्र आईला वाटू लागलं की तो आपल्यामुळंच असा आतून कुढत-कढत आहे. नववधूच्या पहिल्या सुखाच्या, उल्हासाच्या क्षणी त्याला असा दुर्मुखलेला बघून ती फार व्यथित होत होती. पुढं या व्यथेला नाराजीचं, रागाचं रूप येऊ लागलं आणि वडिलांच्या माघारी ती त्याच्याशी नीट वागेनाशी झाली. हळूहळू ती त्याच्याशी सतत आणि उघडपणे वाईट वागू लागली. तो जे बोले किंवा करी त्याच्यात दोष काढून, ती त्याला टाकून-दटावून बोलू लागली. खायला रात्रीचं उरलेलं शिळंपाकं अन्न देऊ लागली. त्याच्या लहान-लहान चुकांचा राईचा पर्वत करून ती त्याच्या वडिलांकडं गाऱ्हाणं गाऊ लागली आणि बापानं त्याला शिक्षा केलेली पाहून तिला आतून आनंद होत असे. तिला पहिलं मूल झाल्यावर वेमनाची स्थिती अधिकच वाईट झाली. तो अभिमानी व उसळत्या वृत्तीचा होता. त्यानं तिला विरोध केला असता परंतु आपल्या वडिलांच्या जीवनात ' त्या ' सख्या आईची जागा घेण्यासाठी आलेल्या या स्त्रीशी दांडगाईनं वागणं त्याला प्रशस्त वाटलं नाही. तिनं केलेला अपमान, छळ मुकाट सोसणं, हेच त्याला आपल्या आईवरच्या प्रेमामुळं आणि तिच्या विषयीच्या आदरभावनेमुळं योग्य वाटलं.

वेमना आता किशोरवयातून तारुण्याच्या उंबरठ्यावर आला होता. घरातल्या अशांत व असुखी वातावरणामुळं तो देवदासींच्या प्रेमात ओढला गेला. कोणतीही गोष्ट अर्धवट करणं त्याला माहीतच नव्हतं. तो कुविख्यात रंगेल, व्यभिचारी बनला. अनेक वेश्यांशी त्यानं संबंध जोडले. शेवटी त्यांतील एका मुलीवर तो लुब्ध झाला. ती तरुण, आकर्षक व कलावती होती. ती गात असे. तोडी-राग तर ती अप्रतिम

आळवीत असे. ती वीणावादनातही कुशल होती. बेगुमान व अडाणी वेमनाबद्दल तिच्याही मनात प्रेम निर्माण झालं. ती त्याला माणसाळविते, सुसंस्कृत करते. फारसा श्रीमंत नसलेल्या या एकाच पुरुषाबरोबर वाढणारे आपल्या मुलीचे घनिष्ठ संबंध जडत चाललेले पाहून तिच्या आईला चिंता वाटू लागते. तिच्याकडून मिळणाऱ्या रतिसुखाच्या मोबदल्यात तो तिला काही रक्कम देत होता. पण ती रक्कम नियमित नव्हती, भरपूर नव्हती. पुढं पुढं तर ती रक्कमही त्याला देता येईना. तेव्हा त्या वृद्धेनं त्याला घरी येण्याची तत्काल मनाई केली. मग तो चोरून येऊ लागला. पण त्या काकदृष्टी वृद्धेनं पाळत ठेऊन त्याला पकडलं आणि हाकलून लावलं. मनातून दु:खी झालेला वेमना तिच्यासाठी झुरू लागला. त्या लोभी म्हातारीचा खून करण्याचे बेत करू लागला. परंतु या मधल्या काळात त्या देवदासीनं दुसऱ्या एका प्रियकराची निवड केली. त्यामुळं तो निराश झाला. त्या भोगलोलुप जीवनाला तो पूर्णपणे विटला.

वेमना निवळला आहे असं पाहून त्याच्या बापानं सक्तीनं त्याचं लग्न लावून दिलं. विवाहित जीवनाची पहिली कांही वर्षं वेमनाला काव्यमय वाटली. सुखी समाधानी जीवनाची तो स्वप्नं पाहू लागला. पण तीव्र धक्क्यानं त्या स्वप्नातून लवकरच जागा झाला. त्याच्या पत्नीची व सावत्र आईची सारखी भांडणं होऊ लागली. कटकटीशिवाय, हिडीस तमाशा केल्याखेरीज एक दिवस काय, एक तासही कधी सुना जात नसे. एकत्र कौटुंबिक जीवन अशक्य आहे असं वेमनाला दिसून आलं. त्यानं वेगळं बिऱ्हाड केलं. पण त्यामुळं त्याचा त्रास कमी झाला नाही, उलट अधिक वाढला. त्याच्या बायकोला नीट संसार करता येत नाही असं त्याला दिसून आलं. ती आळशी व उधळ-माधळ करणारी स्त्री होती. सुग्रास अन्नाची सवय असलेल्या त्याच्यासारख्या भोजनप्रिय माणसाला तिचा स्वयंपाक बेचव निकृष्ट वाटत होता. स्वैपाकापेक्षाही तिचं वागणं अधिक वाईट, तिरस्करणीय होतं. ती नेहमी त्याला टोचून वाकडं बोलत असे आणि वेमनावरचा राग दुष्टपणानं ती मुलांवर काढीत असे. ती त्यांना वारंवार निष्कारण बदडून काढीत असे. त्याची कुसंस्कारी मुलंही त्याच्या या दु:खात आणखी भर घालीत.

एकत्र कुटुंबातून बाहेर पडल्यावर वेमनानं आपल्या वाट्याला आलेल्या शेतीवर मेहनतीनं काम केलं. ऊस, तेलबिया यांचं नगदी पीक त्यानं चांगलं काढलं. पण घरातल्या अशांत, दु:खद वातावरणामुळं पुढं त्याचं शेतीकडं दुर्लक्ष होऊ लागलं. शेतीचं उत्पन्न कमी कमी होऊ लागलं. तशात आणखी खाणारी तोंडे वाढली. त्यामुळं त्याचा जमेचा व खर्चाचा मेळ बसेना. कर्ज काढून त्यानं संसार चालवला. त्यानंतर त्याच्यावर एक मोठंच संकट कोसळलं. किडीनं आणि रोगानं त्याची ऊसाची लागवड

उध्वस्त झाली आणि त्यात गुंतवलेला पैसा वाया गेला. त्याचे सावकार कर्जवसुली-करिता त्याला त्रास देऊ लागले. त्याच्या गहाण पडलेल्या घरावर आणि शेतावर जप्ती आणण्याची धमकी देऊ लागले. अशा संकटकाळी त्याला किमयेचा छंद लागला. लोखंडाचं सोनं करण्याचं रहस्य जाणणाऱ्या भोंदू लोकांच्या (गोसावी, बैराग्यांच्या) तो नादी लागला. परंतु या सर्व भोंदू लोकांनी त्याची फसवणूक केली. शेवटी त्याला एक गुरू भेटला. उत्तम हेतुपूर्ण जीवन जगून, निकृष्ट मानवी जीवनाचं सोनं कसं करता येईल हे त्यानं वेमनाला पटवून दिलं.

वेमनाच्या जीवनकथेची ही पुनर्रचना, ही नवनिर्मिती अगदीच काल्पनिक केवळ कल्पित म्हणता येईल का ? दुसऱ्या शब्दांत सांगायचं म्हणजे याला एक नवी दंतकथाच ठरवायचं का ? ती तशी आहे असे क्षणभर मानलं तरी ती एक तर्कनिष्ठ शक्यता आहे हे तरी खरं आहे की नाही ? ती खरी आहे आणि नाहीही कारण या कथेतल्या प्रत्येक गोष्टीला वेमनाच्या काव्यात आधार सापडतो. शेतीच्या कामाबद्दलची त्याची माहिती, अन्नाविषयीची त्याची आवड-नावड, काही पशु-पक्ष्यांविषयीचा त्याला असलेला लळा आणि इतर काहींचा तिरस्कार, संगीता-विषयीचं त्याचं प्रेम, विशेषत: तोडी-रागाविषयीचं त्याचं आकर्षण, आणि इतर लहान-सहान गोष्टींविषयीची पसंती-नापसंती या सर्वांचे स्पष्ट पुरावे फार मोठ्या प्रमाणात त्याच्या कवितांतून देता येतील. आता फक्त बालपणी झालेला त्याच्या आईचा मृत्यू, सावत्र आईकडून त्याला मिळालेली वाईट वागणूक, देवदासीवर जडलेलं त्याचे उत्कट प्रेम, त्याचं दु:खी कौटुंबिक जीवन, आर्थिक आपत्ती आणि किमयेचा त्याचा छंद या काही महत्त्वाच्या घटनांची संगती लावायचं काम शिल्लक राहातं. या प्रश्नाचा आपण क्रमाने विचार करू.

आईविषयीचं प्रेम, भक्ती, आदर हा त्याच्या शिकवणुकीचा महत्त्वाचा विशेष आहे. पायाभूत भाग आहे. 'जो आपल्या आईला जाणतो, तो ईश्वरालाही जाणतो' असे उद्गार त्यानं एका ठिकाणी काढले आहेत. अर्थात् याला एक सर्वसामान्य उक्ती, अर्थांतरन्यास म्हणता येईल. पण त्यानं आपल्या वैयक्तिक अनुभवाचाही उल्लेख पुढील कवितेत केला आहे. ' तुमची आई जिवंत असते तोंपर्यंतच तुमच्यावर प्रेमाचा वर्षाव होतो, तोंपर्यंतच तुमचे कोडकौतुक होतं. ती गेल्यानंतर कोणी तुमची काळजी घेत नाही. म्हणून तो भाग्याचा काळ तुमच्या वाट्याला आला आहे तोंपर्यंतच तुम्ही त्याचा लाभ घेतला पाहिजे.' आईच्या मृत्यूनंतर जर त्याची हेळसांड झाली नसती, दुष्ट व क्रूर वागणूक त्याला मिळाली नसती, तर ही कविता त्याच्या हातून लिहिली गेली असती का ? आपली आई जिवंत असेपर्यंत, आपल्या आईशी आपण

नीट वागलो नाही, तिचे उपकार फेडू शकलो नाही या दु:खाचा उसासा, या वेदनेचा हुंदका त्याच्या ह्या ओळीतून ऐकू येत नाही काय ?

दुसरीही एक कविता अशीच वैशिष्ट्यपूर्ण व बोलकी आहे. — ' सावत्र आई नेहमी तुमचे दोष शोधीत असते. सख्या आईची सहनशीलता, क्षमा ती कधीच दाखवू शकत नाही. खरी सूक्ष्म दृष्टी तुमच्या अंगी असेल तर तुम्ही मानवी स्वभावाच्या अंतरगांत शिरून हे बघितलं पाहिजे. ' मातृहीन अवस्थेत सावत्र आईचा छळ ज्यानं व्यथित मनानं, मुकाट्यानं सोसला असेल, त्याच्याच हातून ह्या ओळी लिहिल्या जाऊ शकतात.

देवदासीच्या प्रकरणासंबंधीचे उल्लेख तर अगदी सरळ व उघड आहेत. एका कवितेत तो सांगतो — ' एकादी देवदासी तुमच्यावर प्रेम करीत असेल आणि तिला तुम्ही आवडतही असाल पण त्यामुळं तिच्या आईकडून होणाऱ्या मानहानीला पायबंद बसणार नाही. जिची म्हातारी आई अजून जिवंत आहे अशा देवदासीच्या प्रेमपाशात सापडणं ही तर फार मोठी दुर्दैवी घटना आहे !' या ओळींत देवदासी प्रकरणाच्या पूर्वार्धाला आधार मिळतो, तर त्याच्या उत्तरार्धासाठीचा आधार पुढील कवितेत आढळतो. — ' कामवासनेच्या तृप्तीनंतर आपल्या रखेलीला जो घृणेनं बाजूस सारतो त्यानं तिच्या भविष्याची काळजी काय म्हणून करावी ? जेवण झाल्यावर उष्टी पत्रावळ आपण रस्त्यावर फेकतो. ती गटारात पडली तर त्याची थोडीच आपण चिंता करतो ?' प्रेमसंबंध तोडायला, देवदासी नव्हे, तर आपण स्वत:च कारणीभूत झालो ही खंत त्याला सारखी पोखरीत होती. त्यामुळं तो आपल्या जखमी स्वाभिमानाचं, ह्या विचारानं सांत्वन करीत होता असं म्हटलं तर ते तर्कहीन ठरेल काय ?

कर्जबाजारीपणाबद्दल त्यानं जो कडक इषारा दिला आहे तो त्यानं सोसलेल्या आर्थिक आपत्तींचाच निदर्शक मानावा लागेल. ' जो कर्जापासून मुक्त आहे. . . ' तो म्हणतो, ' तोच या जगातला सर्वांत श्रीमंत माणूस आहे. '

त्याचं गृहजीवन अत्यंत अशांत, दु:खी होतं, या अनुमानाला बळकटी देणाऱ्या अनेक सूचक ओळी त्याच्या काव्यात आढळतात. त्याचा व्यवहार नीट नव्हता म्हणून त्याचं गृहजीवन दु:खमय झालं असं म्हणता येणार नाही.

बालपण संपल्यावर आणि ईश्वरप्राप्तीच्या मार्गाला लागल्यावर, या जगातली प्रत्येक व्यक्ती आणि प्रत्येक वस्तू, आई-बाप, बायका-मुलं इ. सर्व गोष्टी केवळ अडथळे आहेत, अशी त्याची खात्री पटली; त्या क्षणापर्यंत मात्र विवाहित आयुष्यासंबंधी त्याची फार उच्च कल्पना होती. ' प्रेमळ पत्नी आणि मुलं असताना——' तो,

विचारतो, 'माणसानं कशाला स्वर्गाची इच्छा धरावी ?' असा प्रश्न विचारणारा माणूस आपल्या पुढील आयुष्यात अकांडतांडव करणाऱ्या कर्कशा स्त्रियांवर आणि नालायक मुलांवर सतत टीकेचा भडिमार करीत राहतो याचं रहस्य काय ? दु:खी संसारी जीवनाशिवाय या कडवटपणाला दुसरं कांही कारण असू शकतं काय ? एका कवितेत सदा करकरत राहाणाऱ्या स्त्रीला त्यानं पायाला चावत राहाणाऱ्या जोड्याची, टोपीत शिरलेल्या गांधिलमाशीची, डोळ्यात सलणाऱ्या कुसळाची आणि काळजात बोचणाऱ्या काट्याची उपमा दिली आहे.

आता या पुनर्रचित कहाणीत एकाच गोष्टीचं समर्थन करायचं शिल्लक उरलं आहे. ती गोष्ट म्हणजे वेमनाचा किमयेचा छंद. या गोष्टीची खात्री पटवणाऱ्या अनेक कविता त्याच्या काव्यसंग्रहातून काढून दाखवता येतील. त्याचे काही शिष्य, सोनं कसं करावं याचा सिद्धांत त्याच्या कवितेत सापडेल म्हणून अजूनही प्रयत्न करीत आहेत. त्याच्या काव्याच्या काही गूढ, रहस्यमय ओळीत, तो अर्थ दडलेला आहे अशी त्यांची समजूत आहे.

वेमनाच्या आयुष्याचा मार्ग गुलाब पुष्पाचा मार्ग नव्हता. चढणी-उतरणीची, धोकादायक वळणांची ती एक अत्यंत अवघड वाट होती. अनेकदा तो या वाटेवरून घसरून पडला. पण प्रत्येक वेळेला त्यानं स्वत:ला सावरलं आणि आपला पुढचा प्रवास त्यानं चालूच ठेवला. सामान्य माणसापेक्षा अधिक कसोटीचे, अधिक क्लेशाचे, दु:खाश्रूंनी भिजलेले प्रसंग त्याच्या वाट्याला आले होते. या प्रसंगांनीच त्याला कठोर, त्यागी, सहिष्णु बनवलं, त्याच्यावर शुद्ध संस्कार केले आणि त्याला विशाल दृष्टीचा, धीरगंभीर आवाजाचा आणि धीट व मुक्त विचाराचा असामान्य माणूस बनवला.

# घनांधकाराची रात्र

'भीषण अंधाराची आणि गहन सावल्यांची ही भयाण काळी रात्र'

— मिल्टन

व्यक्ति, कवी आणि तत्त्वज्ञ या सर्व दृष्टींनी वेमनाचं संपूर्ण व्यक्तिमत्व आपल्याला जाणून घ्यायचं असेल, तर त्याच्या काळाचाही शोध आपण घेतला पाहिजे. कारण त्याच्या जीवनाची, कलेची आणि विचारांची मुळं त्या काळातच खोलवर रुजलेली आहेत. माझं हे म्हणणं विरोधाभासात्मक किंवा परस्परविरोधी वाटण्याचा संभव आहे, पण ते एक सत्य आहे. आपल्या काळात ज्याची मुळं खोल रुजलेली असतात आणि त्या मुळांनी जमिनीतलं सत्त्व शोषण करून जो आपला जीवन रस मिळवतो त्या प्रतिभावंतालाच आपल्या काळाच्या अतीत होऊन अक्षयतेच्या प्रांतात प्रवेश करणं शक्य होतं. मुळाशिवाय जगणारा माणूस केवढाही गुणी असला, तरी त्याला कुठंच स्थिर होता येत नाही. वाहाणाऱ्या वाऱ्याच्या झोतानं तो सारखा गदगदा हालत राहतो आणि शेवटी एखाद्या प्रबळ झोतानं विस्मृतीच्या गर्तेत फेकला-जाऊन कायमचा नाहीसा होतो.

रॉबर्ट लिंड या इंग्रज टीकाकारानं थॉमस ग्रे या कविविषयी जे म्हटलं आहे, तसेच उद्‌गार वेमनाविषयीही काढता येतील. त्या टीकाकाराच्या म्हणण्याप्रमाणे वेमनालाही याची जाणीव होती की, " कविता म्हणजे काही केवळ शब्दांचा खेळ नव्हे, वास्तवाची ती एक प्रतिमा आहे. दूरच्या स्थळकाळातील आदर्शांच्या निरर्थक प्रशंसेत खरं काव्य नसतं. ते आपल्या श्वासोच्छ्वासासारखं आपल्या जवळ, आपल्यातच असतं. " आणि खरोखरच त्याच्या काव्यात त्याच्या काळाचं पूर्ण प्रतिबिंब उमटलेलं दिसतं. त्याच्या काव्याचं विश्लेषण करून त्याच्या आधारावर वेमनाच्या जीवन-कथेची जशी आपण पुनर्रचना केली, त्याप्रमाणं त्या काव्याच्या आधारानं, ज्या काळात तो जगला, त्यानं काव्य लिहिलं आणि लोकांना आपले विचार दिले त्या काळाचं साधार सुंदर चित्र आपण त्याच्या काव्यात पाहू शकतो. ग्राम्य, विद्रूप आणि निकृष्ट स्वरूपाचा तो एक ऱ्हासकाल होता. भौतिक साधनांच्या दृष्टीनं तो काळ निकृष्ट होता, विचार आणि भाषा यांच्या दृष्टीनं ग्राम्य होता आणि इतर सर्व दृष्टींनी विद्रूप

होता. मध्ययुगीन भारताच्या इतर प्रदेशांप्रमाणे आंध्र प्रदेशाचाही तो ऱ्हासकाळच होता — त्याच्या अवनतीचं ते अखेरचं पर्व होतं. ' अंधार आणि सावल्यांनी दाटलेली घनांधकाराची ती भयाण रात्र' होती.

वेमनाच्या काळातील धार्मिक परिस्थितीचं चित्र त्याच्या काव्यात स्थूल-पणानं असं उमटलेलं दिसतं — वेमना ज्या लढाऊ आणि सुधारक शैव पंथाचा अनुयायी होता, तो शैवपंथ आता लढाऊ तर नव्हताच, सुधारकही उरला नव्हता. बाराव्या शतकात, कर्नाटकात बसवानं स्थापन केलेल्या पंथानं अनेकेश्वरी वादाचा धि:कार केला आहे, वैदिक यज्ञविधीची निंदा केली आहे, पुरोहिताच्या कर्मकांडावर टीका केली आहे, वर्णाश्रम पद्धतीचा निषेध केला आहे, जातिभेद व लिंगभेद त्याला अमान्य आहेत; त्यानं अस्पृश्यतेवर हल्ला चढवला आहे आणि सर्व प्रकारच्या अतिरेकी संन्यास-मार्गावर त्यानं कडक टीका केली आहे. त्या पंथाची शिकवण केवळ नकारात्मक नाही, त्याला विधायक बाजूही आहे. अनुभवावर आधारलेलं ज्ञान आणि ज्ञानावर आधारलेली श्रद्धा त्या पंथाचा पाया आहे.

आंतरजातीय विवाहांतून साध्य होणारी सामाजिक समता, कौटुंबिक जीवनाचं पावित्र्य, शारीरिक श्रमाची प्रतिष्ठा व नैतिक गुणाचं संवर्धन यांचं हा पंथ समर्थन करतो. मानवतावादी विचारानं हा पंथ प्रेरित झाला आहे आणि विश्वबंधुत्व हे त्याचं उद्दिष्ट आहे. पंडित श्रीपती, पंडित मल्लिकार्जुन, पालुकुरिकी सोमनाथ वगैरे लोकांनी बसवप्रणीत वीरशैव पंथाचे लोण प्रथम आंध्र प्रदेशात आणलं आणि वेगानं तिथं त्याचा प्रसार झाला. समाजातल्या सर्व जातींत या पंथाचे अनुयायी आहेत. समाजातल्या उच्च वर्णाच्या ब्राह्मणांपासून ते कनिष्ठ वर्गाच्या अस्पृश्यां-पर्यंतच्या सर्व जातींची माणसं या पंथात सामील झाली. या पंथानं एक नवा उष:काल निर्माण केला. एका नव्या विचाराचं केंद्र स्थापन केलं आणि सुधारणेच्या चळवळीच्या एका नव्या आघाडीची उभारणी केली.

परंतु वेमनाच्या कालखंडात, काळाच्या ओघाबरोबर या वीरशैव पंथाचा ध्येय-वाद ओसरला आणि मूळ स्वरूपाचं हिडीस व्यंगचित्र तेवढं मागं उरलं. जातीजाती-तले व पंथापंथातले भेदभाव नष्ट करण्यासाठी निघालेल्या ह्या पंथाचा, त्या प्रयत्नांत दारूण पराभव झाला; आणि अनेक पंथ व संप्रदाय यांनी छिन्नविछिन्न झालेल्या हिंदुसमाजात शेवटी एक पंथ म्हणूनच त्याचं अस्तित्व उरलं. खरं म्हटलं तर, दोन नव्या पंथांची भर पडली असं म्हटलं पाहिजे. वर्णभेदाच्या आधारावर या पंथाचीही दोन शकलं झाली. ब्राह्मण शैव यांचा आराध्य मार्ग झाला आणि ब्राह्मणेतर शैवांच्या वर्गाला जंगम हे नाव प्राप्त झालं. परिणामत: नवे कर्मकांड व आचार

जन्माला आले, धर्मगुरुंचा एक नवा वर्ग निर्माण झाला. त्याबरोबरच नव्या दैवतकथा व नवी 'मिथिके' (MYTH) आणि नव्या भ्रामक रूढी यांची पिलावळ बहुसंख्येनं निर्माण झाली. धर्माच्या मूलतत्त्वापेक्षा त्याच्या बाह्याचाराला अधिक महत्त्व देण्यात आलं. सर्वांगाला भस्म फासलं, लिंग धारण केलं, ठराविक वेळी शिवाचं नामस्मरण केलं, विशिष्ट दिवशी उपास केले आणि तीर्थस्थानांची यात्रा केली की धर्मकार्याचं पालन झालं. थोडक्यात सुविहित दंभाचाराला धर्म हे नाव मिळालं. धर्माची ही दुरावस्था असह्य झाल्यामुळं वेमना चिडून विचारतो, " अप्रामाणिकपणं केलेलं धार्मिक विधींचं हे पालन, ही खोटी, दांभिक शिवभक्ती यांचा काय उपयोग आहे ?" व्यापक दृष्टिकोन आणि इतर धर्माबद्दल सहिष्णुता यांचा उल्लेख करून तो पुढं म्हणतो, " तुम्ही त्याला ' कुंडा ' (मडक्यासाठी तेलुगु शब्द) म्हणा, अथवा ' कुंभ ' (मडक्यासाठी संस्कृत शब्द) म्हणा, या दोन्ही शब्दांनी एकाच वस्तूचा बोध होतो. त्याचप्रमाणे ' कोंडा ' आणि ' पर्वत ' या दोन्ही शब्दांना डोंगर हा एकच अर्थ आहे. तसंच तुम्ही ' उप्पू ' म्हटलंत काय किंवा ' लवण ' म्हटलंत काय, ती वस्तू मीठच असते. त्याप्रमाणे नावं अनेक असली तरी तो ईश्वर एकच आहे. " जेव्हा, तो बघतो की आपला हा उपदेश, आपल्या वीरशैव बांधवांच्या बाबतीत व्यर्थ निरुपयोगी ठरला आहे, तेव्हा तो उफाळून म्हणतो, " आमची शड्शास्त्रं वीरशैव तत्त्वांची बरोबरी करू शकत नाहीत. आमच्या या लिंगाइतांइतके जगात दुसरे कुणी ढोंगी धार्मिक नाहीत. "

वैष्णव या नावानं ओळखला जाणारा, विष्णूच्या उपासकांचा पंथदेखील क्रांतिकारी सुधारणेची एक चळवळ म्हणूनच आरंभाला सुरू झाला. पण वेमनाच्या काळापर्यंत त्याच्यातला स्फुलिंग विझून गेला. पंथातील अंतर्गत भेदाभेदांचं आणि त्याच्या अधःपतनाचं अत्यंत हीन, निर्बुद्ध उदाहरण द्यावयाचं म्हणजे, ' तेंगल' व 'वडगळ' या दोन पंथातील अनुयायांचं देता येईल. हे दोन्ही उपपंथातील अनुयायी एकाच विष्णूचे भक्त. पण ते परस्परांना विषारी द्वेष दृष्टीनं बघतात. त्यांच्या वादाच्या, संघर्षाच्या कारणांचा उल्लेख ब्राऊननं केला आहे. आपण ज्या काळाची चर्चा करीत आहोत, त्याच्या बऱ्याच नंतरच्या काळातला हा उल्लेख आहे. स्नानानंतर कपाळी लावावयाच्या गंधाच्या टिळ्याचा, पंथदर्शक प्रतिकचिन्हाचा आकार कसा असावा, हा त्यांच्या वादाचा मुख्य विषय होता. या वादाला पुढं इतकं तीव्र स्वरूप आलं की त्यातून ' गंभीर स्वरूपाच्या दंगली निर्माण झाल्या आणि त्यात अनेकजण प्राणाला मुकले ' (ब्राऊनच्या शब्दांत).

शैव आणि वैष्णव पंथामधील वादाचं, वैमनस्याचं स्वरूप तर यापेक्षा अधिक भयंकर स्वरूपाचं होते. प्रसंगी त्यांना हातघाईच्या लढायांचं स्वरूप आलं आणि

परिणामी अविचारी कत्तली झाल्या. या हिंस्र संघर्षाच्या मधला काळ अशा धुमसणाऱ्या द्वेषात आणि प्रचंड क्षुब्धतेत जात होता, की अक्षरशः शस्त्ररक्षित शांतीचा काळ असंच त्याचं वर्णन करावं लागेल. एखाद्या वैष्णवाला जर शैवाचा स्पर्श झाला तर तो तत्काळ सचैल स्नान करी. ही गोष्ट अविश्वसनीय वाटली तरी खरी आहे. वैष्णवाचा स्पर्शही शैवाला असाच अपवित्र वाटत होता. या विकृत दुराग्रहांनी व्यथित झालेला वेमना प्रश्न विचारतो, " वैष्णव आणि शैव या दोघांत कसला फरक आहे ? मेल्यानंतर एकाला जाळतात तर दुसऱ्याला पुरतात एवढाच ना ? मग, ईश्वराच्या नावानं हे भांडण कशासाठी ? " यापुढं एक पाऊल जाऊन तो असंही म्हणतो, " अनेक धर्म आहेत, पण एकही धर्म निश्चित व शाश्वत नाही. शेवटी आपलं वाईट आणि चांगलं कर्मच तेवढं शाश्वत आहे. विचारांती असंच दिसून येतं, की कोणत्याही एकाच धर्माला सत्याची मक्तेदारी दिलेली नाही. धर्मात ज्यांचे हितसंबंध गुंतले आहेत, अशा लोकांशी चर्चा करणं व्यर्थ आहे, असा विचार व्यक्त करून तो सामान्य लोकांना उपदेश करतो, की या पुरोहित वर्गापासून तुम्ही दूर रहा. " धर्माचा व्यापार करणारांत . . . . ." तो म्हणतो, " हजारो फसवणारे भामटे आहेत, त्यांच्यापासून सावध राहा. मासे पकडण्यासाठी निघालेल्या बगळ्यांचे हे थवे आहेत. "

वैष्णव आणि शैव या पंथांचा अधःपात सुरू झाल्याबरोबर पुन: वैदिक यज्ञविधीला प्राबल्य मिळालं. हे यज्ञ पूर्वीच्या प्रमाणात चालू नसले, तरी ते वारंवार करण्यात येऊ लागले. या प्रवृत्तीचा वेमनानं आपल्या परखड शब्दांत धिःकार केला आहे. " तुमचा उच्च वर्णीयत्त्वाचा अधिकार कशावर आधारलेला आहे ?" वैदिक पुरोहितांना तो विचारतो, " यज्ञाच्या नांवानं असहाय्य पशूंची हत्त्या करण्यावर आणि पवित्र यज्ञज्वालेवर भाजलेल्या मांसाचा स्वाहाकार करण्यावर तो अधिकार अवलंबून आहे काय ?" दुसरा हल्ला चढविताना तो त्यांना पुन्हा प्रश्न करतो, " सिंहासारखे बलवान असल्याचा तुमचा दावा आहे, पण सिंहाची ती शक्ती गरीब मुक्या बकऱ्यांची मान मुरगाळण्यातच दाखवायला पाहिजे का ?" आणखी एका ठिकाणी तो त्यांना विचारतो, " महान कार्याच्या पूर्तीसाठी आत्मसमर्पण करणं हा सर्वात उत्तम यज्ञ नाही काय ?" वैदिक याज्ञिकाला स्वर्ग प्राप्त होतो, स्वर्गातील रंभा या अप्सरेचा उपभोग त्यांना घ्यायला मिळतो, अशी एक समजूत आहे. या समजुतीवर प्रहार करताना वेमना त्यांना असा सवाल करतो, " पिता आणि पुत्र दोघेही यज्ञ करून स्वर्गात गेले आणि ते दोघे एकाच शय्येवर रंभेचा उपभोग घेऊ लागले, तर त्यांच्या हातून अगम्यगमनाचं पातक घडत नाही काय ?" सर्व आघाड्यांवरून, तत्कालीन

धार्मिक रूढींवर व श्रद्धांवर वेमना ज्या तीव्रतेनं वारंवार व अप्रतिहत हल्ले करतो त्यावरून त्या काळात त्या धार्मिक श्रद्धांचं किती अधःपतन झालं होतं, हे स्पष्ट होतं.

त्या काळातली सामाजिक व राजकीय परिस्थितीदेखील काही चांगली होती असं म्हणता येत नाही. मध्यवर्ती सत्ता देशात कुठंच नव्हती. क्षुद्र राजांच्या हाती लहान लहान राज्यांची सत्ता होती. ते इतके दुबळे होते की, " कोणीही गुंड उद्दामपणाने त्यांच्या सत्तेला आव्हान देऊ शकत असत, असं वेमनानं म्हटलं आहे. सत्तास्थानी बसलेल्या दुबळ्या माणसांप्रमाणे हे सारे राजे तापट व लहरी होते. त्यांच्याभोवती खुषामतखोर विदूषकांची गर्दी असे. खोट्या स्तुतीचे ते भुकेले होते आणि तेच त्यांचं मुख्य अन्न होतं. आळशी व विलासी जीवनाचे ते भोक्ते होते आणि प्रतिकार करू न शकणाऱ्या दुर्बळ माणसावर ते जुलूम करीत असत. अशा राजांच्या संदर्भात वेमना उद्गारतो, " तो मूर्ख असतो, तर त्याचा मुलगा लुच्चा असतो. त्याचा मित्र लावालावी करणारा असतो आणि त्याचा मंत्री गंदी, अक्कलशून्य असतो. माकड हे वानरांच्या सहवासातच सुखी असते." तो दुसऱ्या ठिकाणी उद्गारतो " तो सर्व कार्यक्षम माणसांची हकालपट्टी करतो. बरोबरच आहे. जोडे चघळणाऱ्या कुत्र्याला उसाची गोडी कशी चाखता येणार ?" शेवटी तो असा सावधगिरीचा इषारा देतो — " राजावर कधीच विश्वास ठेऊ नका, किंवा त्याची चाकरी स्वीकारू नका. कारण ते विषारी नागाच्या सहवासात राहण्याइतकंच भयंकर आहे."

अशा दुबळ्या आणि दुष्ट राजांच्या अंदाधुंद राज्यकारभारात प्राण किंवा मालमत्ता सुरक्षित राहू शकत नाही. दरोडेखोर उन्मत्त होऊन खेड्यापाड्यांतून लुटालूट करून त्यांचा नाश करतात. त्यांना उद्देशून वेमना म्हणतो, " तुम्ही लोकांची कत्तल करीत आहात, हातपाय तोडून त्यांना अपंग करीत आहात, खेडीपाडी उध्वस्त करीत आहात. सध्या तुम्ही मुक्त फिरत आहांत, परंतु यमराजाच्या क्रोधापासून तुमची सुटका कशी होईल ?" मृत्युच्या किंवा कल्पांताच्या भीतीने निढावलेले गुन्हेगार क्वचितच लुटालट व अत्याचार यापासून परावृत्त होतात. बेफिकिरीने प्रजेला पिडण्याचें आपलें कृत्य ते चालूच ठेवतात. अशा प्रकारच्या न्यायनीतीहीन परिस्थितीतून सतत दुष्काळ, रोगराई, आणि इतर अनेक संकटे उद्भवतात आणि जीवनाची गती खुंटून जाते. ज्ञान, कला आणि कौशल्य यांचाही ऱ्हास होतो. म्हणून वेमना अशी पृच्छा करतो, " माणसं उपाशी मरत असताना कला आणि कौशल्य यांचा विकास कसा होईल ? ज्ञानाची वृद्धी कशी होईल ? कच्च्या मडक्यात पाणी कसं भरता येईल ?"

अशा काळ्याकुट्ट ऱ्हासकाळात वेमनाचा जन्म झाला आणि तोच एकटा या काळाला आव्हान देण्यासाठी उभा राहिला. त्यानं त्याचा स्पष्ट शब्दात निषेध

केला, हे त्याचं फार मोठं श्रेय आहे. प्रसंगी त्याची वाणी निर्भिड, शब्द कठोर आणि त्याची टीका अतिशय मर्मभेदक असली तरी मुळात तो स्वभावानं मृदू, प्रेमळ आणि सहिष्णु होता. मनानं मृदू आणि संवेदनशील हृदयाचा तो माणूस होता म्हणून सडक्या कुजक्या परिस्थितीच्या जाणीवेनं त्याच्या आत्म्याला यातना झाल्या आणि त्याविरूद्ध त्यानं आपला आवाज उठविला. या प्रयत्नात त्याला ढोंगी, वेडा अशा निंदेचा माराही सहन करावा लागला. या निंदाव्यंजक विशेषणांचा पदवीप्रमाणे त्यानं आनंदानं स्वीकार केला. पण आपल्या आदर्शापासून तो मुळीच ढळला नाही. मध्ययुगीन भारतातल्या तत्त्वज्ञ कवींच्या परंपरेतला तो बहुतेक शेवटला कवी होता आणि या परंपरेतल्या श्रेष्ठ कवींतच त्याची गणना करावी लागेल.

* * *

# कवि उवाच

' तो कवी आपल्या उत्स्फूर्त विचारांचा उद्गाता होता. '

— इमर्सन

तेलगु साहित्याचे धर्मगुरू आता वेमनाला कवी मानू लागले आहेत; पण केवळ एक कनिष्ठ कवी म्हणून. 'शतक-कवि' परंपरेतील तो एक प्रसिद्ध कवी, असं त्यांचं मत होतं एवढंच फार तर म्हणता येईल. वेमनाच्या कवितेचा रूपबंध 'शतक' काव्याच्या स्वरूपाचा आहे हे खरं. त्यांचं ध्रुवपददेखील पुष्कळदा एकच असतं, क्वचित त्यात फरक पडतो. पण तो फार कमी असतो. परंतु केवळ रूपबंधाची चर्चा न करता त्याच्या मूळ आशयाचा विचार केला, तर असं दिसून येईल, की सुधा आणि चुना यात जितका फरक आहे, तितकंच अंतर शतक-काव्य आणि वेमनाची कविता यांच्यात आहे. शेकडो शतक-कवी तेलुगु भाषेत आहेत. ते सारे कमीअधिक प्रमाणात स्तुतिपाठक (स्तोत्रकार) कवी आहेत. ते आपल्या इष्ट देवतेची किंवा आश्रयदात्यांची स्तुती गातात. जेव्हा ते नीतिबोध करू पाहातात, तेव्हा त्यांचा दर्जा, रूढ, सर्वसामान्य, झिजलेल्या नीतिवचनांच्या संग्राहकांपेक्षा अधिक असत नाही. त्यांची मनं उथळ, कोरडी, रसहीन असतात. त्यांची शैली निरस आणि अप्रौढ (थिल्लर) असते. दुसऱ्या शब्दात, एकंदरीत त्यांची कविता पंडिती, विद्वत्ताप्रचुर असते. याउलट वेमनाच्या काव्यात प्रतिभेची नवी नवी स्फुरणं, निसर्गाच्या निरीक्षणाची नाजुक चित्रं, उत्कट आणि प्रामाणिक भावानुभूती, सखोल चिंतन आणि धीट व निर्भय अभिव्यक्ती यांचा प्रत्यय येतो. ' शतककवी किंवा शतककविसम्राट ' असे वेमनाचं वर्णन पी. चेंचय्या आणि राजा एम. भुजंगराव या दोन टीकाकारांनी आपल्या ' तेलुगु साहित्य ' या ग्रंथात केलं आहे. त्यांचा हा अभिप्राय त्याच्या काव्याला योग्य न्याय देणारा नाही. डॉ. सी. आर. रेड्डी यांनी या ग्रंथाच्या प्रस्तावनेत जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो अधिक ग्राह्य वाटतो. ' आमच्या काव्याकाशातला तो एक अत्यंत तेजस्वी तारा आहे. ' असं त्यांनी वेमनाबद्दल म्हटलं आहे. त्यानं पुराणे किंवा प्रबंध यांची रचना केली नसेल, तरीही त्याची गणना, अभिजात कवींत करावी लागेल. त्याच्या कवितेला एक अभिजात स्पर्श आहे. तिला

एक अभिजात स्वरूपाची वैशिष्ट्यता प्राप्त झाली आहे. इंग्रजी साहित्याचा इतिहास-कार कझामियन या साहित्यिकाच्या शब्दांत सांगायचं तर त्यानं ' महान अभिजातता' साध्य केली आहे, असंच म्हणावं लागेल. रॉबर्ट बर्न्सविषयी लिहिताना, कझामियन यानं असं म्हटलं आहे की, " सौंदर्यशास्त्राच्या परिभाषेत, रॉबर्ट बर्न्सच्या कृतीला एक ' महान अभिजातता ' लाभली आहे. संप्रदाय आणि शास्त्रनियम या दोन्हीच्या बंधनापलीकडची, मुक्त, स्वयंपूर्ण अशा स्वरूपाची ही अभिजातता आहे. " वेमना हा बर्न्सप्रमाणेच शेतकरी समाजातून आलेला आहे आणि त्याची प्रतिभाही त्याच प्रकारची आहे. त्यानंदेखील स्वत:ची वेगळी महान अभिजातता निर्माण केली आहे आणि ती स्वतंत्र, स्वयंपूर्ण आहे.

वेमनानं आपली कविता लिहिली नाही. ती तो बोलला आहे. त्याचा तो उत्स्फूर्त उद्‌गार आहे. वड्स्वर्थप्रमाणे त्याची कविता म्हणजे ' प्रशांत स्थिर अवस्थेतला भावनेचा पुन:प्रत्यय ' नाही. तप्त, उकळत्या भावनांचा तो उद्रेक आहे. ते एक ध्येयाला समर्पित झालेलं व्यक्तित्व होतं. त्याच्या भावनांना स्थिर होण्याइतका अवकाशच नव्हता. त्याची भूमिका कवीची नव्हती. गूढवादी प्रेषिताच्या भूमिकेवरून तो कवितेचं चिंतन करीत होता. म्हणून त्यानं काव्याच्या शास्त्राकडं लक्ष दिलं नाही. भरत दण्डी, अभिनवगुप्त, हेमचंद्र, भोज आणि इतर काव्यशास्त्रांतील आचार्यांची नावंही त्यानं ऐकली नसतील. तरीही श्रेष्ठ काव्याचा तो उद्‌गाता होता. तो जन्मजात कवी होता; म्हणून त्याच्या हृदयातल्या प्रत्येक प्रामाणिक व उत्कट व सळसळत्या भावनेचा उद्‌गार काव्यरूपातच बाहेर पडत होता. त्याची कविता म्हणजे एक महापूर होता. ज्वालामुखीचा स्फोट होता, समुद्राला खवळविणारं ते एक प्रमत्त वादळ होतं. असं असलं तरी त्याचं दुसरं टोक तितकंच तरल, कोमल रूप धारण करणारं होतं. कधी ते पहिल्या पावसाचं रूप धारण करीत असे, तर कधी ते दक्षिणवायुच्या मंद शीतल लहरीप्रमाणं झुळझुळत येत असे आणि कधी ते पक्ष्यांच्या मधुर प्रभातकूंजना-प्रमाणे आसमंतात घुमत असे.

आकाशवाणीच्या मद्रास केन्द्रावरून १९५० साली, ध्वनिक्षेपित झालेल्या आपल्या भाषणात डॉ. सी. आर. रेड्डींनी वेमनाविषयी म्हटलं आहे, " तो निसर्गाचा आणि नैसर्गिक कवी होता. " या ठिकाणी त्याच्या विश्लेषणात्मक रसग्रहणातली काही वाक्यं उद्‌धृत करावीशी वाटतात —

" कोणत्याही अर्थानं तो शिकलेला माणूस नव्हता. विद्वान पंडित तर मुळीच नव्हता. पण तो एक गंभीर वृत्तीचा चिंतक होता. त्याची चिंतनशक्ती आणि प्रतिभा भेदक व जीवनातील आध्यात्मिक आणि ऐहिक समस्यांचा अंतरंगाचा ठाव घेणारी

होती. त्याची कविता म्हणजे स्वच्छ आणि शुद्ध पाण्याचा नैसर्गिक झरा आहे. त्याचे विचार आणि शैली दोन्ही स्वतंत्र व मौलिक आहेत. फक्त तीन ओळीत, आमच्या समोर तो संपूर्ण कविता उभी करतो. अल्पाक्षरता हा जर बुद्धिमत्तेचा गुण मानला तर त्याच्याइतका बुद्धिमान माणूस जगात झाला नाही, असं म्हणावं लागेल. आपल्या सर्व उपमा आणि रूपकं त्यानं रानांतून, शेतांतून, ग्रामीण दृष्यांतून आणि वातावरणातून टिपली आहेत. तो जसा निसर्गाचा कवी आहे तसा नैसर्गिक प्रवृत्तीनंदेखील तो कवीच आहे."

वेमनाच्या विचारांशी सहमत न होणारेदेखील त्याची काव्यशैली असामान्य आहे, हे निर्विवादपणे मान्य करतील. ही कविता, सरळ, सोपी; पण सामान्य व शिळी नाही. ती मधुर आहे पण तोंडाला मिठी बसवणारी नाही. सर्वसामान्यांच्या भाषेतील सारे चैतन्य आणि विविधता त्याच्या शैलीत भरपूर प्रमाणात आहे. पहिल्या प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे, तिच्यावर त्याचं असामान्य प्रभुत्व आहे. कांही ठिकाणी त्याची कविता दुर्बोध वाटते ही गोष्ट खरी आहे. पण जिथं तो गूढ आध्यात्मिक अनुभवाला शब्दरूप देतो तिथंच असं घडतं. गूढ आध्यात्मिक अनुभव हे नेहमीच व्यक्तिगत असतात. ते कुणाच्या प्रत्ययाला येतात तर कुणाच्या मुळीच येत नाहीत. ज्यांना त्यांचा प्रत्यय येतो त्यांना ते वास्तव वाटतात आणि ज्यांना ते आलेले नसतात त्यांना ती कविता अवास्तव आणि दुर्बोध वाटते. आपल्या आध्यात्मिक अनुभवांचे खरं स्वरूप प्रतिकांच्या मदतीशिवाय दुसऱ्यांना कळवणं हे हिंदु, ख्रिस्ती किंवा सूफी या प्रत्येक गूढवाद्यांना आपल्या शक्तीबाहेरचं आहे, असं जाणवतं. इतर गूढ आध्यात्मवाद्यांप्रमाणे वेमनादेखील स्वतःची वैयक्तिक प्रतिकं वापरतो. उदाहरणार्थ, —— 'निद्रेपलीकडची निद्रा', 'ज्ञानापल्याडचं ज्ञान', 'अवकाशाच्या सीमेपलीकडचा अवकाश', 'दर्शनांतर्गत दर्शन', 'पडद्याआडचा प्रकाश', 'शरीरांतर्गत आत्मा आणि प्राणकोशातलं शरीर'. त्याने उपयोजिलेल्या अनेक प्रतिकांपैकी सढळपणे वापरलेल्या प्रतिकांची ही काही उदाहरणं. सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने वेमनाची आध्यात्मवादी गूढ कविता कितीही दुर्बोध असो, ती आजच्या अतिवास्तववादी काव्यापेक्षा किंवा अमूर्त कलेपेक्षा कांही अधिक दुर्बोध नाही. काही गोष्टी या फक्त सुचवता येतात त्याची स्पष्टीकरणं देता येत नाहीत, ही गोष्ट सरळपणं मान्य करण्याऐवजी वेमनाचे कांही अनुयायी अवर्णनीय, अनिर्वचनीय गोष्टींचं स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न करून, स्वतःला हास्यास्पद करून घेतात.

आपल्या काव्यासाठी वेमनानं 'आटावेलदी' हे वृत्त निवडलं आहे. ते त्याच्या प्रतिभासंपन्न अभिव्यक्तिला योग्य व साजेसं आहे. हे वृत्त त्यानं निर्मिलेलं नाही. ते एक प्राचीन 'देशीय' वृत्त आहे. त्या शब्दाचा अर्थ 'नर्तकी' असा होतो. नाच्या-

पासून शेकडों कवींनी त्याचा उपयोग केला आहे. परंतु वेमनाइतक्या कुशलतेनं, कलापूर्णतेनं कुणीच या 'नर्तकी'ला नाचायला लावलं नाही. कालीदासाची 'मंदाक्रांता' भवभूतीची ' शिखरिणी ', तिकण्णाचं ' कंदम ' आणि श्रीनाथाचं ' सीसम ' वृत्तांवर, जसं त्या त्या कवींचे प्रभुत्त्व होतं, तशाच प्रकारचं प्रभुत्त्व वेमनाचं या वृत्तावर आहे. इंग्रजी वाङमयातूनदेखील दोन अशी समांतर उदाहरणं काढून दाखवता येतील. शेक्सपियरच्या मुक्तछंदानं (BLANK VERSE) आणि पोप कवीच्या प्रौढ सयमक द्विपदीनं जी किमया केली, तशीच किमया वेमनानं या वृत्ताच्याद्वारे केली आहे. यासंबंधी लिटन स्ट्रॅचीनं असे उद्‌गार काढले आहेत : –

' हे (वृत्त) पोपच्या हाती प्रकर्षाला गेलं. त्याचं संपूर्ण सामर्थ्य आणि सौंदर्य तिथं प्रकट झालं. ' ' आटावेलदी ' हे वृत्त वेमनाच्या हाती अशाच पूर्णावस्थेला जाऊन पोचलं. त्याच्यापूर्वी दुसऱ्या कोणत्याही तेलुगु कवीला या वृत्तांत सुप्तपणे वास करीत असलेली सहजता, नादमयता उमगली नाही आणि त्यांना त्याचा उपयोगही करून घेता आला नाही.

वेमनाच्या संकलित काव्यसंग्रहाच्या ज्या आवृत्ती प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांत ' आटावेलदी ' खेरीज इतर वृत्तांत रचलेल्या रचनाही आढळतात. परंतु ह्या कविता त्या संग्रहातील प्रमुख गाभ्याच्या कवितांच्या तुलनेत, त्यांच्या पासंगालाही पुरत नाहीत. ह्या कवितांतून साधेपणा, सरळपणा आणि भेदकता ही त्याची वैशिष्टयं आढळत नाहीत. ही सारी कविता प्रक्षिप्त असावी, असं रालापल्लीचं मत आहे आणि ते यथार्थ वाटतं.

' आटावेलदी ' हे वृत्त वेमना ज्या कुशलतेनं हाताळतो त्याचं वर्णन करताना डॉ. जी. व्ही. कृष्णराव आपल्या समारोपात लिहितात, " सामान्यत: तो (वेमना) पहिल्या दोन ओळींत आपल्या मनातील कल्पना स्पष्टपणे मांडतो, आपल्याला काय म्हणायचं ते सांगतो आणि हा आपला विचार श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या मनात ठसविण्याकरिता तिसऱ्या ओळीत एखाद्या चमकदार उपमेचा अथवा दृष्टांताचा वापर करतो; आणि चौथी ओळ ही केवळ अलंकरण (मुकुट) असते. या विश्लेषणावरून ही गोष्ट स्पष्ट होते, की या वृत्ताचं सारं सौंदर्य तिसऱ्या ओळीतल्या उपमा-दृष्टांतावर अवलंबून आहे. कसलेल्या धनुर्धारीचं शरसंधान एखादे वेळी आपलं लक्ष्य चुकेल, पण वेमनाच्या दृष्टांताचं लक्ष्य कधीही चुकणार नाही. त्याच्या काव्याचं सौंदर्य आणि थोरवी यावरच बव्हंशी अवलंबून आहे. त्याच्या काव्यात या दृष्टांतालंकाराला एक नाविन्य व टवटवीतपणा आला आहे. पुष्कळदा त्याला सुभाषितांचं, अर्थांतरन्यासाचं स्वरूप प्राप्त होतं आणि त्यामुळं वाचकाला एक सुखद धक्का बसतो.

कालीदास हा कवी उपमेचा बादशहा आहे, तर वेमना हा दृष्टांतसम्राट आहे.* ''

वेमना हा काव्यात दृष्टांताचा अतिरिक्त वापर करतो असा जो समज सामान्यत: पसरलेला आहे, त्यातून डॉ. कृष्णरावही सुटलेले नाहीत. वेमनानं आपल्या काव्यात दृष्टांताचा पुष्कळ ठिकाणी उपयोग केला आहे, पण प्रत्येक कवितेत त्यानं तीच क्लृप्ति योजिली आहे, असं म्हणणं बरोबर ठरणार काही. आकडेवार विश्लेषण करताना असं आढळून आलं आहे की एकूण काव्याच्या पंधरा टक्के कवितेत त्यानं दृष्टांताचा उपयोग केला आहे. बऱ्याच ठिकाणी दृष्टांताची पुनरुक्ति झाली आहे. काही ठिकाणी, थोडे फेरफार करून किंवा मुळीच फेरफार न करता ते वापरले आहेत, तर काही ठिकाणी थोडेबहुत शाब्दिक फेरफार केले आहेत. गाढव आणि कुत्रा या प्राण्यांबद्दल वेमनाच्या मनात कायम घृणा आहे आणि ती त्याच्या काही दृष्टांतांत प्रतिबिंबित होते. पण वेमनाची दृष्टांताची योजना नेहमी अत्यंत नेटकी, अचूक, चमकदार आणि प्रसंगी सुखद धक्का देणारी असते. त्याच्या पुनरुक्तीचा विसर पडतो. काव्याच्या शैलीसंबंधी आणखी एक मुद्दा सांगायला हवा. वेमना आपल्या काव्यात तर्कनिष्ठ पद्धतीचा उपयोग करतो, हे खरं असलं, तरी पहिल्या ओळीत एक विचार मांडतो, दुसरीत त्याचा प्रतिवाद करतो आणि तिसऱ्या ओळीत त्या दोन्हींचं संश्लेषण किंवा समन्वय घडवून आणतो. या एकाच पद्धतीचा अवलंब त्यानं आपल्या संपूर्ण काव्यात केला आहे, हे जे मत अनेकांनी मांडलं आहे, ते मात्र बरोबर नाही. या पद्धतीचा अवलंब केलेल्या त्याच्या कवितांची संख्या शंभरापेक्षाही कमी भरेल.

वेमनाच्या कवितेतल्या तिसऱ्या चरणाचं सौंदर्य व सामर्थ्य अनुवादात नष्ट होतं हे गृहीत धरून, त्याच्या कांही प्रश्नार्थक चरणांची कांही उदाहरणे पुढे देत आहे. :

दिवा लावल्याशिवाय तुम्हाला अंधार कसा नाहिसा करता येईल ? – कुत्र्याच्या शेपटीला धरून तुम्हाला गोदावरी नदी तरून जाता येईल काय ? —एखादं चिलटं हत्तीच्या साह्याला कसं काय धावून जाऊ शकेल ? —दुधानं धुतलं तरी कोळशाला पांढरा शुभ्र रंग कसा येईल ?– सरोवर आटलं की बगळे त्याला सोडून जात नाहीत का ? .— तरुण, अल्पवयीन हातात मशाल दिली म्हणून तिचा प्रकाश थोडाच कमी होणार आहे ? — मेंढरानं लांडग्याच्या मृत्यूचा शोक काय म्हणून करावा ? कुत्र्याचं शेपूट कधी सरळ होतं का ? बाहुलीला नीतिबोध कसा करता येईल ? गाढव सुगंधी अत्तराचा भार घेऊन निघाला, तरी त्याचा गलिच्छपणा कसा

---

* या उताऱ्यात थोडा शाब्दिक फेरफार करण्यात आला आहे, पण त्याच्या अर्थाला किंचितही ढळ पोचलेला नाही.

कमी होणार ? वरून खाली भिंत बांधीत येणं कधी शक्य आहे काय ? चेंडू कितीही उंच फेकला तरीही तो तिथं स्थिर का राहाणार आहे ? — ताम्र्यासारखा सोन्याचा आवाज होतो काय ? — डोंगरदेखील आरशात लहानच दिसतो ना ? — गोदावरीत स्नान केल्यामुळे कुत्र्याला (ग्रामसिंहाला) वनराज सिंहाची पदवी प्राप्त होईल काय ? — खातेऱ्यात लोळणाऱ्या डुकराला गुलाबपाण्याची काय किंमत ? रेडा कितीही माजला तरी तो हत्तीची बरोबरी करू शकेल काय ? पुरुषाची कामं करू लागली म्हणून स्त्री, पुरुष होऊ शकेल काय ? चमच्याला स्वतः वाढलेल्या पदार्थाचा स्वाद काय कळणार ? — वटवृक्ष विशाल असला तरी त्याचं बीज लहानच असत ना ? —मुंडण केल्यामुळं माणसाचे विचार शुद्ध व पवित्र होतात काय ?—

हे सारे आणि यासारखे असंख्य तिसरे चरण आज तेलुगु भाषेत लोकप्रिय म्हणींचं स्थान पटकावून बसले आहेत.

इतर गुणांबरोबर वेमनाला निर्मळ विनोद बुद्धीचंही मोठं देणं लाभलं होतं गांधीजी एकदा म्हणाले होते, ' मला विनोदबुद्धीची जोड नसती तर मी कधीच आत्महत्त्या केली असती. ' वेमनाच्या तोंडून देखील असेच उद्गार बाहेर पडले असते. त्याचे उद्देश उच्च होते आणि आपल्या उराशी बाळगलेल्या विशाल ध्येयाच्या साधनेत तो इतका गुंतलेला होता की, त्याच्या अंगी विनोद करून हसण्या-हसवण्याची कला नसती, तर त्यानंही कदाचित आत्महत्त्या केली असती. विनोदाच्या ह्या शक्तीनं त्याच्या कवितेला एक वेगळं परिमाण दिलं आहे. कृपण माणसं ही त्याच्या विनोदी टीकेची विशेष लक्ष्य होतीं. ' कृपण माणसाशी संबंध ठेवू नयेत असं तुम्हाला वाटत असेल तर ——' वेमना एका कवितेत सांगतो, ' त्याच्यावर विषप्रयोग करण्याची गरज नाही, किंवा इतर जालिम उपाय योजण्याचीही आवश्यकता नाही, त्याच्याकडं मोठ्या देणगीची मागणी करा, त्या धक्क्यानं तो तत्काळ प्राण सोडील. ' दुसऱ्या एका पद्यात तो म्हणतो, ' कृपणाच्या घरात मृत्यू घडून आला, तर तो फार मोठ्याने आणि फार दीर्घ काळ आक्रोश करतो. कारण अंत्ययात्रेसाठी येणाऱ्या खर्चाच्या कल्पनेनं त्याच्या हृदयाची चाळणी झालेली असते. ' दुसऱ्या एका पद्यात तो कृपणावर कसा हल्ला करतो पहा. ' शुष्क झालेल्या वांझ गायीची तुम्ही धार काढू पहाल-तर तिच्याकडून एक लाथ मात्र मिळेल तुमच्या बरगड्यांत. कृपणाकडूनही तुम्हाला, यापेक्षा अधिक लाभ होणार नाही. ' खरा आध्यात्मिक गुरू आपल्याला एकांतस्थानी भेटेल असा विश्वास बाळगणाऱ्यांची थट्टा करताना तो म्हणतो, ' स्वर्गाची वाट दाखवणाऱ्या थोर गुरु शोधण्याच्या निष्फळ प्रयासात तुम्ही एखाद्या अंधाऱ्या गुहेत शिरलात तर, रानटी श्वापदाशी तुमची गाठ पडेल आणि ते तुम्हाला तुमच्या अपेक्षे-पेक्षाही अधिक वेगानं स्वर्गात पोचवील.' चार्लस् डिकन्स याच्या विनोदाबद्दल जे

म्हटलं जातं तेच वेमनाच्या विनोदाविषयीही म्हणता येईल. ' त्याचा विनोद हा एका मर्यादेपर्यंत प्रचारकी विनोद आहे. ' केवळ हसवण्याच्या उद्देशानं तो विनोद करीत नाही, तर त्यामागे त्याचा निश्चित उद्देश असतो.

वेमनाच्या शस्त्रागारात आणखी दोन प्राणघातक आयुधं आहेत. ती म्हणजे उपहास आणि व्यंग्योक्ती.

खोटया धार्मिक समजुतीवर आणि रूढीवर प्रहार करण्याच्या बाबतीत व्हॉल्टेअरनं असा थोर नियम घालून दिला होता की, त्या रूढींची व समजुतींची चर्चा करीत बसू नये. कारण, त्या बुद्धिनिष्ठेवर, बुद्धिवादावर आधारलेल्याच नसतात आणि वेमनाचाही व्हॉल्टेअरप्रमाणे या तत्त्वावर विश्वास होता. म्हणून तो देखील व्हॉल्टेअरप्रमाणे त्यांची चर्चा करीत बसत नसे, तर त्या खोटया समजुतीवर व ढोंगा-वर उपहासाच्या शस्त्रानं तीव्र प्रहार करून त्यांना हास्यास्पद ठरवीत असे, असं डॉ. रेड्डी यांनी म्हटलं आहे. वेमनाच्या अशा उपहास-उपरोधाची अनेक उदाहरणं दाखवता येतील. धर्माच्या आत्म्यांकडं दुर्लक्ष करून, त्याच्या बाह्य अवडंबराचं जे स्तोम माजवतात, त्या दांभिकांवर वेमनानं उपहासाचे कठोर प्रहार केले आहेत. तो म्हणतो — ' वारंवार, घडोघडी स्नान करून तुम्हाला मुक्ती लाभणार आहे का ? मग ती साऱ्या मासळयांना आधी मिळाली पाहिजे. सर्वांगाला भस्मलेपन करून पुण्यसंचय करता येईल असे तुम्हाला वाटतं का ? तर मग ही गाढवं रात्रंदिवस राखेच्या ढिगाऱ्यातच लोळत असतात. शाकाहारी व्रताच्या पालनानं कायिक पावित्र्य संपादन करता येईल, अशी तुमची समजूत आहे काय ? मग या बकऱ्या-मेंढ्या तुमच्यावर सहज विजय मिळवू शकतात. " वेमनाचे पुढील उद्गार तर ह्यापेक्षाही विदारक आहेत. — ' जेव्हा तुम्ही यज्ञविधीला सुरवात करता, तीर्थस्थानांचं दर्शन घेता, तेव्हा नापित मुंडण करण्याकरिता तुमच्या डोक्यावर पाणी शिंपडतो आणि ब्राह्मणही तुमच्या आत्म्याला मुक्ती मिळावी म्हणून पवित्र जलाचं प्रोक्षण करतो. ब्राह्मण उपाध्यायाच्या जलप्रोक्षणाचा काय परिणाम झाला हे कोणाला दिसत नाही. परंतु मुंडण केलेल्या तुमच्या तुळतुळीत डोक्यावरून नापिताच्या पाण्याचा परिणाम मात्र स्पष्ट दिसून येतो. ' जातिभेदाच्या पोकळ दंभाचारावर उपरोधी हल्ला चढवताना तो म्हणतो — ' शूद्राचा मुलगा अपरिहार्यपणे शूद्रच होतो, असं जर आहे, तर मग वसिष्ठाला उत्तम ब्राह्मणाची पदवी कशी देता ? तो तर उर्वशी या शूद्र वेश्येचा मुलगा होता. ती उर्वशी स्वर्गांगना होती तरी शेवटी ती शूद्रच होती ना ? अस्पृश्य स्त्रीच्या पतीला शूद्रच मानण्यात यावं असा नियम आहे, तर वसिष्ठा-बद्दलचा तुमचा अभिमान अनाठायी नाही का ? त्याची पत्नी अरुंधती ही अस्पृश्य नव्हती काय ?' हिंदूंच्या दृष्टीने पुराणकथा या पवित्र मानल्या जातात, पण वेमनानं

आपल्या उपहासाच्या माऱ्यातून त्यांनाही वगळलं नाही. 'विष्णू क्षीरसागरात निद्रा घेतो असा तुमचा विश्वास आहे ना ? मग क्षीरसमुद्रातला हा भगवान (कृष्णाच्या आठव्या अवतारात) गवळ्यांच्या घरातल्या दुधाची का चोरी करतो ? चोरीचं पेय अधिक मधुर असतं, म्हणून तो असं वागतो का ? आपल्या तरुण पत्नीला मागे एकटी टाकून रामसुद्धा सुवर्णमृगाच्या पाठलागासाठी निघाला. त्याला त्या कपट-नाटकाचा संशयदेखील आला नाही. अशा अविचारी माणसाला ईश्वर कसं म्हणायचं ? भाविकांचा असा समज आहे की, रामानं अग्न्यस्त्र सोडून सर्व समुद्र आटवून टाकला. मग तेथून तो सरळ लंकेला का गेला नाही ? मोकळा मार्ग मिळाला असताना त्यानं त्यावर सेतु बांधण्याचा खटाटोप का केला ? ब्रह्मा एकाला संपत्ती देतो आणि दातृत्व-बुद्धी दुसऱ्यालाच प्रदान करतो. देवाची ही करणी विकृत-विपरीत नाही का ? '

याप्रमाणे ' वेमनाची शैली अनेक रूपं धारण करते ' असे डॉ. रेड्डी म्हणतात कधी ती कडवट, प्रखर, पोळून काढणारी असते, तर कधी हळुवार उपहासाचं कोमल उपरोधाचं रूप घेते, तर कधी गोड थट्टा विनोद करते. त्याच्या विषयांचं क्षेत्रही असेच विविध व व्यापक आहे. माणसाशी आणि त्याच्या कल्याणाशी संबंधित असलेली कोणतीही गोष्ट त्याला क्षुद्र, वर्ज्य वाटत नव्हती. गटेच्या संदर्भात मॅथ्यू अर्नोल्ड यानं पुढील उद्गार काढले आहेत :

' दुःख-यातना भोगणारी सारी मानवजात त्याच्या नजरेसमोर होती. त्याची प्रत्येक जखम त्यानं वाचलेली होती आणि त्याच्या प्रत्येक दुबळेपणाची त्याला जाणीव होती. ' इथं तुला दुखतं, इथं तुला वेदना होतात ' असं म्हणतच त्यानं प्रत्येकाच्या दुःखावर बोट ठेवलं आहे. '

वेमनानंही असंच केलं. त्यानं मानवजातीचं दुःख नुसतं ओळखलंच नाही, तर त्यावर त्यानं उपायही सुचविले आहेत. मनुष्याच्या सेवेत तो नेहमीच अग्रेसर होता. खेड्यापाड्यांतून तो सारखा भटकत होता, घराघरांतून फिरत होता. प्रत्येक ठिकाणी तो तिथल्या माणसांशी बोलत होता — आणि कवितेतूनच बोलत होता. साहित्य-लेखन करण्याचा हेतु त्याच्यामागं नव्हता. म्हणून त्या कविता लेखनबद्ध करण्याची काळजी त्यानं घेतली नाही. त्याच्यावरील प्रेमामुळं, आदरभक्तीमुळं त्यांच्या शिष्यमंडळींनी त्याच्या कविता टिपून घेतल्या. हे लोक शिकलेले नव्हते. म्हणून त्यांनी जे ताडपत्रावर लिहून घेतलं, ते बऱ्याच वेळा चुकीचं होतं. पुढं जेव्हा या मूळ ताडपत्रावरच्या हस्तलिखितांवरून नकला करण्यात आल्या तेव्हा त्यात आणखी काही चुका घडल्या. एखादा शब्द किंवा पंक्ती या नकलाकारांना अस्पष्ट वाटली, नीट लागली नाही, तिथं त्यांनी पदरचा शब्द किंवा संपूर्ण ओळ घुसडून

दिली. त्यामुळं या गोंधळात आणखी भर पडली; आणि यावर कळस म्हणजे त्याच्या भक्तांनी आणि निंदकांनी आपल्या रचनाही वेमनाच्या नावावर खपवल्या.

ब्राऊनच्या काळानंतर नव्यानं उपलब्ध झालेल्या हस्तलिखित बाडांतून आणि समाजात पाठांतरपद्धतीनं प्रचलित असलेल्या कंठगत कवितांतून मिळून जवळ जवळ तीन हजार पद्यं जमा करण्यात आली आहेत. त्यातली किती पद्यं त्याची स्वकृत असतील यासंबंधी जबरदस्त शंका वाटते. ब्राऊनच्या संग्रहात कांही पद्यं प्रक्षिप्त असल्याचं स्पष्ट दिसतं. ते कांही असलं तरी वेमनाच्या काव्याची चिकित्सक व अधिकृत आवृत्ती अद्याप प्रसिद्ध करण्यात आली नाही. ब्राऊननं संग्रहित केलेल्या पद्यांतच लुडबूड केली आहे.

ही दुर्दैवी परिस्थिती बदलण्यासाठी काहीतरी उपाययोजना करण्याची वेळ आता आलेली आहे. ' कंदम ' वृत्तातली विश्वसनीय वाटणारी काही निवडक पद्यं सोडून ' आटावेलदी ' वृत्ताखेरीज इतर वृत्तांत असलेली पद्यं वगळण्यात आली आणि त्यातून पुनरावृत्त होणाऱ्या कल्पनांची पद्यें वजा केली आणि केवळ उत्कृष्ट तेवढीच रचना निवडली; तसंच वेमनाच्या मूलभूत तत्त्वाला आणि श्रद्धेला बाध आणणारी प्रक्षिप्त पद्यं गाळून टाकण्यात आली तर उर्वरित पद्यांची संख्या बहुतेक दोन हजारां-पेक्षा अधिक भरणार नाही. ही पद्यं संकलित करताना वेमनाच्या मूळ कवितेवर संस्कार करण्याचा वेडगळ प्रयत्न करता कामा नये. तो लोकांच्या भाषेतच लोकांशी संवाद साधण्याचा प्रयत्न करीत होता. म्हणून त्या लोकांच्या बोलीतलं मुळातलं सौंदर्य कायम ठेवलं पाहिजे. व्याकरण आणि छंद यांच्यापेक्षा अल्पाक्षरत्व आणि धक्का देऊन जागे करण्याची वैंजस शक्ती सुरक्षित ठेवण्याकडं त्याचं अधिक लक्ष होतं; आणि व्याकरण व छंद यांच्या नियमांचं उल्लंघन अपरिहार्य आहे असं जेव्हा जेव्हा त्याला वाटलं, तेव्हा त्यानं निःसकोचपणे त्यांचं उल्लंघन केलं आहे. जाणून-बुजून त्यानं हे उल्लंघन केलेलं असल्यामुळे, त्याचं परिष्करण करता कामा नये. या नियमांचे काटेकोर पालन करणाऱ्या एखाद्या ' नियमबाजाशी ' त्याची आयुष्यात कुठंतरी गाठ पडली असावी. नाहीतर त्यानं अशी तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केली नसती. तो म्हणतो, " तो नीच क्षुद्र माणूस स्वतः अभिजात कवीसारखी रचना करू शकत नाही, तरीही तो दोष काढण्याचं साहस करतो. एखाद्या कुत्र्याला भांड्यांची उतरंड सहज पाडता येईल. पण ती त्याला कधी रचता येणं शक्य आहे का ?" म्हणून वेमनाला व्याकरण-छंदाच्या खोड्यात अडकवण्यापेक्षा संपादनाच्या आधुनिक शास्त्रशुद्ध पद्धतीचा अवलंब करून त्याच्या काव्याची अधिकृत आवृत्ती तयार करणं आवश्यक आहे.

हस्तलिखितांमधली वेमनाची कांही पद्यं अश्लीलतेच्या काठावर रेंगाळतात, प्रसंगानुसार तो प्रखर, तिखट होतो, तीक्ष्ण चावेही घेतो. पण चविष्टपणाने अश्लीलतेत रस घेण्याचा आरोप त्याच्यावर करता येणार नाही. अश्लीलतेत मग्न होणाऱ्यांवर त्यानं एका पद्यात टीका केली आहे. त्यांना तो ग्राम्य म्हणतो. चिखलात लोळणारी डुकरं असे तो त्यांचं वर्णन करतो. यासाठी त्याच्या काव्याची अधिकृत आवृत्ती अश्लीलतेच्या दोषांपासून अलिप्त ठेवली पाहिजे.

त्याला योग्य न्याय मिळावा म्हणून किमयेशी संबंधित असलेली बाष्कळ पद्यरचनाही वगळली पाहिजे. त्याचा नवा जन्म होण्यापूर्वीच्या काळात, भाग्योदयाचा सोपा मार्ग म्हणून वेमनानं किमयेच्या विद्येवर (परसुवेदी) विश्वास ठेवला असेल. परंतु पुढे तो त्या भ्रमातून बाहेर पडला असला पाहिजे. नाही तर अज्ञान, खोट्या समजुती आणि ढोंग यांच्यावर प्रहार करणारा इतक्या प्रखर वृत्तीचा उपदेशक तो झालाच नसता. म्हणून किमयेच्या कृतीसंबंधीची सारी पद्यं प्रक्षिप्त मानली पाहिजेत. ती पद्यं वेमनाचीच असली तर, किमयेचं रहस्य सांगा म्हणून त्याच्यामागे लागून त्याला त्रास देणाऱ्या मूर्ख, अज्ञानी व लोभी अनुयायांची दिशाभूल करण्याच्या उद्देशानं त्यानं ती लिहिली असली पाहिजेत. काहीही असलं तरी ही अर्थहीन पद्यं गाळलीच पाहिजेत.

हे सर्व केल्यावरही असं आढळून येईल की वेमनाचं काव्य बावनकशी सोन्याचं असलं तरी त्यांतही थोडेफार ' हीण ' आहे. कोणताही उत्तम कवी त्यापासून अलिप्त असू शकत नाही. विशेषत: जेव्हा एखादा कवी शीघ्र–कवी असतो आणि पूर्वतयारीशिवाय आपला उत्स्फूर्त विचार काव्यरूपात बोलून दाखवतो, तेव्हा त्याच्या कवितेत विषम रचना आढळणारच. शिवाय पूर्वी सांगितल्याप्रमाणे वेमनाला साहित्यापेक्षा जीवनाविषयी अधिक तळमळ होती. तो वाणीचा उपयोग कलावंतासारखा करीत नाही, तर योद्ध्यासारखा करतो. जेव्हा तो वाग्युद्धात गुंतलेला असतो, तेव्हा तो तर्कनिष्ठ (बुद्धिनिष्ठ) असतो. या कारणानेही त्याची रचना विषम झाली आहे. कवी आणि काव्य यांच्यासंबंधी बोलताना वेमनानं एका ठिकाणी असे उद्गार काढले आहेत की, ' कोणा माणसानं एखादं जरी उत्कृष्ट पद्य–काव्य लिहिलं असेल, तरीही त्याला उत्तम कवी म्हटलं पाहिजे. काय उपयोग आहे टोपलीभर कांचमण्यांचा ?' तो विचारतो. ' त्यापेक्षा एकच इंद्रनीलमणी अनर्घ्य मोलाचा असतो, नाही का ?' आणि वेमनानं जगाला एकच नाही तर अशा शतावधी इंद्रनीलमण्यांचं दान केलं आहे.

* * *

# सृष्टीचा तत्त्वज्ञ

'एक ग्रामीण माणूस, एक तत्त्वज्ञ सृष्टीचा,
आईच्या ओबड-धोबड अंत:करणाचा'

— होरॅस

वेमना हा काही विद्वान पंडित नव्हता. भारतीय तत्त्वज्ञाच्या प्रमाणित आधार-ग्रंथांचं (उपनिषदं, ब्रह्मसूत्र आणि भगवद्गीता) त्याला ज्ञान नव्हतं. तरीही तो एक अधिकारी तत्त्वज्ञ होता. होरॅसचे जे वचन या प्रकरणाच्या शिरावर उद्धृत केले आहे, त्याप्रमाणं, त्याअर्थानं त्याला आपण 'सृष्टीचा तत्त्वज्ञ' म्हणूया. त्याची मौलिक प्रतिभा आणि जीवनाचा त्याला मिळालेला समृद्ध अनुभव यांच्या बळावर त्यानं एकाच नव्हे तर तीन प्रकारच्या — सामाजिक, नैतिक आणि धार्मिक — तत्त्वज्ञानाची मांडणी केली आहे. या तत्त्वज्ञानाची त्यानं शास्त्रशुद्ध पद्धतीनं मांडणी केलेली नाही ही गोष्ट खरी आहे. परंतु त्याची प्रतिभा ही मुळातच अनियंत्रित व मुक्त होती आणि त्याची प्रवृत्ती अशी प्रक्षुब्ध व स्फोटक होती की तिला एखाद्या पद्धतीचा स्वीकार करणं अशक्यच होतं. इतकंच काय, पण आपल्या वक्तव्यातील विसंगती दूर करण्याचादेखील त्यानं कधी यत्न केलेला नाही. कोणी त्याचं लक्ष या प्रकाराकडे वेधलं असतं, तर वॉल्ट व्हिटमनसारखे त्यानं त्याला उत्तर केलं असतं : ' मी मलाच नाकारतो काय ? ठीक आहे, मी आपलंच खंडन करतो (मी विशाल आहे, अनेक विश्वं आहेत माझ्यात).'

सामाजिक तत्त्ववेत्ता या भूमिकेत तो मानवाच्या समतेचा पुरस्कर्ता आहे. जोंपर्यंत जातिसंस्थेचा, त्याच्यातील भेदाभेदांचा आणि अपमानजनक विषमतेचा, त्यांच्यातील परंपरागत विधिनिषेधांसह अंत होत नाही, तोपर्यंत समतेची स्थापना अशक्य आहे, यावर त्याचा दृढविश्वास होता. त्याचे जातिभेदविरोधी विचार अशा प्रकारचे आहेत :- शूद्राप्रमाणे स्त्रियांनाही वेदाचा अधिकार नाही, त्याअर्थी त्यांचा दर्जाही शूद्राचाच ठरतो. अशा परिस्थितीत त्या शूद्रीचा मुलगा किंवा तिचा पती-देखील शूद्रच ठरत नाही काय ? शिवाय असंही सांगितलं जातं की प्रत्येक पुरुष हा जन्मत: शूद्रच असतो. मग तथाकथित पवित्र सुताच्या धाग्याने – जानव्याच्या

संस्कारानं त्याला उच्चवर्णीयत्त्व (द्विजत्व) कसं प्राप्त होतं ? खरं पाहिलं तर माणसाची जात, वर्ण नव्हे, तर त्याचं चारित्र्य महत्त्वाचं आहे. चारित्र्यहीन माणूस हाच खरा ' माला ' (अस्पृश्य) आहे. दुसरं, ज्याला तुम्ही अंत्यज म्हणता तो माणूस-देखील तुमच्यासारखाच, त्याच रक्तामांसातून बनला आहे ही वस्तुस्थिती आहे ना ? शिवाय त्या अस्पृश्याच्या देहातही त्याच परमात्म्याचा वास आहे ना ? उच्चवर्णीय माणूस नीच आणि लबाड असेल, तर त्याच्यापेक्षा शुद्ध चारित्र्याचा अस्पृश्य हा निश्चितच श्रेष्ठ आहे. मग एखाद्यानं आपल्या वर्णजातीच्या श्रेष्ठत्वाचा तोरा का मिरवावा आणि दुसऱ्याची नीच म्हणून कशासाठी हेटाळणी करावी ? सर्वजण एकाच ईश्वराची लेकरं नाहीत का ? आणि जन्ममृत्यूच्या क्षणी ते समान असतात ना ? जो आपल्या वर्ण-जातीचा त्याग करतो तोच माणूस संत, महात्मा होतो.

वर्ण आणि जाती यांच्याखेरीज वर्गभेददेखील भेदभाव निर्माण करणारी एक शक्ती आहे. या सत्याकडं वेमनानं डोळेझाक केलेली नाही. जातिभेदांपेक्षाही वर्गभेदांमुळं माणसा-माणसांत फार मोठी दरी निर्माण होते, यावर त्याचा विश्वास होता. ' श्रीमंत माणूस कितीही नीच जातीचा असो, तो गरीब माणसावर सत्ता गाजवतो. याउलट दरिद्री माणूस कितीही उच्चवर्णीय असो पीडला जातो. ' तो पुढं म्हणतो, 'मूर्ख माणसं आपल्या वंशाचा, ज्ञानाचा कितीही टेंभा मिरवीत, शेवटी ते श्रीमंत माणसाचे क्षुद्र गुलामच ठरतात, ही वस्तुस्थिती आहे. श्रीमंत माणसात त्याला सर्व प्रकारचे सद्गुण व पावित्र्य दिसू लागतं किंवा तसं ते भासवतात. सौंदर्यात तो मदन आहे, बलवानांत तो भीम आहे, अशी ते त्याची खोटी स्तुती करतात. हांजी-हांजी करणाऱ्या अशा नीच लोकांविषयी वेमनाच्या मनात घृणा आहे; पण तो श्रीमं-तीचा तिरस्कार करीत नाही. " पैशामुळे. . . .' तो म्हणतो, ' आईमुलांतदेखील कडवटपणा (कलह) निर्माण होतो. काही लोक सांगतात त्याप्रमाणे केवळ पैशांनी सुख मिळत नाही, हेही मला मान्य आहे. परंतु पैशाशिवाय जगता कसं येणार ?" एखाद्या माणसानं स्वखुशीनं दारिद्र्य पत्करलं, तर ती वेगळी गोष्ट आहे; ते दारिद्र्य त्याला सत्पुरुष बनवतं, परंतु परिस्थितीमुळं असहाय्यपणे ज्याला गरीबी पत्करावी लागते त्याचा भौतिक आणि नैतिक दृष्ट्या अधःपातच होतो. ' गरीब माणूस प्रामाणिक किंवा धैर्यशील राहू शकत नाही. आपल्या बायकामुलांची अब्रू, स्वाभिमान त्याला वाचवता येत नाही. ' आणि वेमनाच्या दृष्टीनं जो आपल्या कुटुंबाला किमान सुख आणि सुरक्षितता देऊ शकत नाही तो माणूस दयनीय नाही तर तिरस्करणीय आहे. ' दारिद्र्य ', तो बजावतो, ' तो एक वणवा आहे. तो तुम्हाला जाळील, तुमच्या प्रिय-जनांनाही जाळून टाकील. दारिद्र्य हा भयंकर गुन्हाच आहे. ' दारिद्र्याबद्दलची

त्याची ही भयाची भावना जॉर्ज बर्नार्ड शॉ याच्या भावनेशी तुळिता येईल. शॉ म्हणतो, ' दारिद्र्य हे जगातील मोठं पाप आहे. एक भयंकर गुन्हा आहे.'

परंतु शॉप्रमाणे वेमनानं दारिद्र्याच्या या प्रश्नाच्या सोडवणुकीचा विचार समाजवादी दृष्टीनं केलेला नाही. मध्ययुगीन काळातला माणूस कितीही दूरदृष्टीचा असला, तरी त्याच्याकडून या गोष्टीची अपेक्षा करता येत नाही. दारिद्र्याच्या मूळ कारणांचा शोध घेणं अशक्य वाटल्यामुळं, आपली संपत्ती गरजूंना व गरिबांना वाटून द्यावी असं आवाहन त्यानं श्रीमंतांना केलं आहे. भीक मागणं म्हणजे कमीपणा स्वीकारणं आहे, या गोष्टीची त्याला जाणीव आहे. ' भीक मागणारा हा मानवजातीतला अत्यंत वाईट, हीन माणूस आहे.' असं तो म्हणतो. पण लगेच त्याला अशीही पुस्ती जोडतो की, जो भिक्षेकऱ्यांना दान नाकारतो तो त्याच्यापेक्षाही अधिक तिरस्करणीय आहे. परंपरेनं चालत आलेल्या जुन्या भावना व्यक्त करताना तो म्हणतो, ' मरताना तुम्ही आपली संपत्ती बरोबर नेत नाही. ज्यात तुम्ही इतरांबरोबर सहभागी होता तेच तुमचं खरं धन आहे. '

' बसवा' प्रमाणे वेमनाचा देखील श्रमाच्या प्रतिष्ठेवर विश्वास आहे. प्रामाणिक स्वरूपाचा एखादा व्यवसाय स्वीकारला पाहिजे असा तो प्रत्येकाला उपदेश करतो. पुरोहितांच्या व्यवसायाविषयी त्याला मुळीच आदर नाही. तसेच व्यापार उदीमासंबंधी त्याचं चांगलं मत नाही. मध्यस्थांच्या किंवा ज्यात पिळवणूक होते अशा प्रकारच्या सर्व धंद्यांविषयी त्याच्या मनात तिरस्कार आहे. टॉलस्टॉय किंवा गांधी यांच्यासारखा त्याचाही बायबलमधील वचनावर विश्वास असल्यासारखा दिसतो. ' आपल्या भाळीच्या घामाची भाकर तू खाल्ली पाहिजे. ' हाच नियम आणि बरोबर तशाच भाषेत, वेमनानं आपल्या एका पद्यात घालून दिला आहे. कामाला तो देव मानतो. शारीरिक श्रमाचं काम तो अधिक चांगलं समजतो. परिटाकडं दुसरे लोक कमीपणाच्या नजरेनं बघतील, पण वेमनाच्या दृष्टीनं तो समाजाचा एक उत्तम सेवक आहे. मूळ उत्पादक वर्गावर त्याचं प्रेम आहे. आणि शेतकरी त्याला अधिक आवडतात. एका ठिकाणी त्यानं स्वतःचा ' कापू ' असा अभिमानानं उल्लेख केला आहे. त्यावरून कांही लोक एकदम असा निष्कर्ष काढतात की त्यालाही आपल्या जातीचा अभिमान सुटलेला नाही. परंतु वेमनाचा हा अभिमान जातीय नाही. त्याचा हा अभिमान त्याच्या शेतकी व्यवसायाबद्दलचा अभिमान आहे. भटका उपदेशक होण्यापूर्वी तो शेतकरीच होता. एक-दोन ठिकाणी, ज्या जातीत तो जन्मला त्या रेड्डी जातीचा उल्लेख केला आहे. पण तो उल्लेख फारसा प्रशंसेच्या स्वरातला नाही.

वेमनाच्या सामाजिक तत्त्वज्ञानाचं स्वरूप स्थूलपणानं असं सांगता येईल. त्याचे विचार आणि बसव, ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम, रामानंद, कबीर, दादू, नानक, लालदास, रायदास आणि चैतन्य इ. मध्ययुगीन भारतीय गूढवादी संतांचे तात्त्विक विचार प्रामुख्यानं समान आहेत. तपशीलांत थोडाफार फरक असेल. या सर्व थोर संतांनी आपल्या या समान विचारांच्या द्वारा एक प्रकारची क्रांती घडवून आणली. परंतु तिचे परिणाम वरवरचे आणि तात्पुरते ठरले. असे का घडले ? ' आधुनिक भारतीय संस्कृती ' या आपल्या मौलिक व प्रभावी ग्रंथात धूर्जटीप्रसाद मुखर्जी यांनी या प्रश्नाचं उत्तर असं दिलं आहे : ' या गूढवादी आध्यात्मिक क्रांतीमुळं भारताच्या सामाजिक अर्थव्यवस्थेच्या क्षेत्रांत मूलभूत स्वरूपाचे बदल होऊ शकले नाहीत. त्यामुळे ती क्रांती आरशातल्या प्रतिबिंबाप्रमाणे आभासात्मक स्वरूपाची ठरली.'

वेमनाच्या नैतिक क्षेत्रातल्या तात्त्विक विचारांकडं वळलं तर आपल्याला असं दिसून येईल की त्याच्या विचाराला दोन स्तर आहेत. तो ध्येयनिष्ठ होता, परंतु त्याबरोबरच त्याला मानवी स्वभावातील मर्यादांचंही भान होतं. प्रत्येक माणूस योगी होऊ शकत नाही हे त्याला माहीत होतं. अंगात योगी होण्याची पात्रता नसताना योगमार्गात धडपडणाऱ्या माणसापेक्षा प्रामाणिक व नीतिमान संसारी माणूस हा अधिक चांगला. योगमार्गातला अपात्र माणूस तत्त्वभ्रष्ट होतो किंवा मूर्ख ठरतो— ही गोष्टही त्याला समजत होती. म्हणून सामान्य माणसासाठी, आणि कठीण अशा योगमार्गानं जाण्याची इच्छा व तयारी असलेल्या माणसासाठी त्यानं दोन वेगवेगळ्या प्रकारचे नीतिनियम घालून दिले आहेत. एकाच वेळी दोन वेगळ्या गटातील लोकांना उद्देशून तो आपली वक्तव्यं करीत होता, त्यामुळं त्याच्या विचारांत उघड-उघड दिसणारी विसंगती कांही ठिकाणी निर्माण झाली आहे असंही म्हणता येईल.

ज्याच्या अंगी योगी होण्याची योग्यता आहे त्याच्यासाठी संसारी जीवन हा एक पिंजरा आहे, जाळं आहे. बायको किंवा मुलं यांपैकी कोणीही तो मेल्यावर त्याच्याबरोबर येणार नाहीत. कामजीवन हे गलिच्छ व अधःपतन घडविणारं असतं. या जगातली सुखं आणि संपत्ती अशाश्वत आहेत, आणि आत्मज्ञानाच्या शोधात रमणाऱ्या निर्धारयुक्त मनाच्या व्यक्तीनं सर्वांचा त्याग केला पाहिजे, असं त्याचं सांगणं आहे. उरलेल्या संसारी गटातील माणसांना उद्देशून तो उपदेश करतो : ठीक आहे, प्रत्येकाला योगी होता येत नाही. परंतु तुम्ही उत्तम माणूस आणि उत्तम नागरिक सहज होऊ शकता. बालवयात तुम्ही आज्ञाधारक पुत्र व्हा, बुद्धिमान विद्यार्थी बना, प्रामाणिक व्यवसायासाठी आवश्यक असलेलं प्रशिक्षण घ्या. तारुण्यात आल्यावर, सुंदर आणि सुशील कुमारीशी विवाह करा. ती गरीब घराण्यातील असली तरीही हरकत नाही. प्रेमळ आणि समजुतदार पत्नी मिळणं ही फार कठीण गोष्ट आहे. परंतु अशी पत्नी

मिळवण्यात तुम्ही सुदैवानं यशस्वी झालात, तर तुम्ही निश्चितपणे सुखी व्हाल. आपण तिच्या गृहाचे आणि जगाचे राजे आहांत, अशा प्रकारची भावना ती तुमच्या मनात निर्माण करील; आणि सद्‌गुणी मुलांचें वरदान तुम्हाला लाभलं तर या जगातच प्रत्यक्ष स्वर्गसुखाची तुम्हाला प्राप्ती होईल. आपल्या कुटुंबाच्या गरजा पूर्ण करण्या-करिता तुम्ही प्रमाणिकपणे अविश्रांत श्रम करा. कष्ट केल्याशिवाय या जगात काहीच मिळत नाही. ' पाणी घातल्याशिवाय मोगऱ्याची फुलं मिळतील का ? ' नेहमी दयाळू आणि उदार वागणूक ठेवा. घरी आलेल्या गरीब आणि गरजू माणसाला विन्मुख पाठवू नका. जो माणूस द्रव्य सत्कारणी न लावता त्याचा संचय करून ठेवतो त्याची स्थिती शेतातल्या बुजगावण्यासारखीच असते. तो समृद्धीत उभा असतो. पण प्रत्यक्षात त्यातली एकही वस्तू त्याची नसते. आपल्या मातापित्यांचा आदर करा. तुम्ही कितीही यशस्वी आणि कीर्तिमान झालेले असा, पण त्यामुळे आपल्या वडिलांच्या मनात क्षुद्रपणाची किंवा अपमानिताची भावना निर्माण होऊ देऊ नका. सत्याचा शोध घेणारी माणसं वागण्यात व बोलण्यात विक्षिप्त वाटतील, पण तुम्ही त्यांची चेष्टा करू नका. आत्मप्रशंसेत आपला गौरव समजू नका. गर्विष्ठ मूर्ख माणूस हा सर्वांत अधिक मूर्ख असतो. आपला दृष्टीकोन विशाल असू द्या. मृदू भाषण करा, व्यवहारात उदारपणे वागा. आणि आपल्या संसारी जीवनात तुम्ही स्वावलंबीपणाने जगा. ' चांगला माणूस हा संसारात राहूनही योगी असू शकतो.'

कामभावना ही स्वभावतःच प्रबळ व अनियंत्रित स्वरूपाची असते हे वेमनाला स्वानुभवावरून माहिती असल्यामुळं तो म्हणतो, पुरुष हा स्त्रीच्या सौंदर्याचा व प्रणयविभ्रमाचा गुलाम असतो. योगीदेखील लावण्यवती स्त्रीच्या सहवासात स्वतःचं मन सतत शुद्ध व अविचलित ठेवू शकत नाही. तरीही कौटुंबिक जीवनात तुम्ही आपल्या पत्नीशी एकनिष्ठ असलं पाहिजे. दुसऱ्याच्या स्त्रीची वासना धरणं किंवा कामी नजरेनं तिच्याकडे पाहणं पाप आहे. विषयोपभोगाची साधनं मिळविण्याची शक्ती तुमच्या अंगी असली तरीही देवदासींपासून तुम्ही दूर राहा. बाह्यतः त्या कितीही आकर्षक असोत, (अंतरंगानं) त्या गलिच्छ असतात. त्या चंचल, लोभी आणि निर्दय असतात. त्या तुमचं द्रव्य हरण करतात, आणि नंतर पिळलेल्या शुष्क लिंबाच्या सालीप्रमाणे तुम्हाला फेकून देतात. पण तुम्हाला देवदासी ठेवायचीच असेल ( वेमनामधला वस्तुनिष्ठ कवी इथं समोर येतो ), तर सुंदर, सुडौल रंगीची निवड करा. तिचे वागणं आकर्षक असलं पाहिजे. नृत्यसंगीतात ती पारंगत असावी. परंतु तिच्याबरोबर राहाण्याचा निर्णय घेण्यापूर्वी तिची आई जिवंत नाही याची खात्री करून घ्या. (अशा भयंकर उपदेशाचा ज्यांना धक्का बसण्याची शक्यता

आहे, त्यांनी हे लक्षात घ्यावं की एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत देवदासीला रखेली म्हणून ठेवणं हिंदु समाजात प्रतिष्ठेचं लक्षणं मानण्यात येत होतं.)

वेमनाच्या उर्वरित नैतिक उपदेशाचा सारांश असा : परिस्थिती कशीही असो आंतरिक प्रेरणेशी एकनिष्ठ रहा, अढळ रहा. सिंह दुर्बळ व आजारी झाला म्हणजे कुत्रादेखील त्याच्यावर उद्दामपणाने हल्ला करतो. म्हणून प्रत्येक लहान-मोठ्या कार्यावर तुम्ही आपल्या शक्तीचा अपव्यय करावा हे बरोबर नाही. खरा बलवान माणूस हा अबोल, शांत व सहिष्णु असतो. हिंसा तुम्ही टाळली पाहिजे. अहिंसा हा तुमचा धर्म झाला पाहिजे. काही लोक मूर्खपणाने महाभारताचं पंचमवेद असं वर्णन करतात. भाऊबंदकीची, प्राणघातक कलहाची व रक्तपाताची ह्या लोकांना आवड आहे असाच त्याचा अर्थ होत नाही काय ? तुमचा कट्टर शत्रू जरी तुमच्या हातात सापडला तरी तुम्ही त्याचा वध करू नका. उलट क्षमा करून त्याला तुम्ही सोडून द्या. पशूंची हत्या ही मनुष्यवधाइतकीगर्हणीय आहे. जनावरांच्या प्राणांची किंमत तुम्ही कमी का लेखावी ? हे मूर्खपणाचंच कृत्य नाही का ? तुम्ही आपल्या ‘ आतल्या ’ श्वापदाचा वध केला पाहिजे. सर्व सचेतन सृष्टीवर प्रेम करा. शहाणपणानं जीवन जगा. शानदारपणानं, डौलात आपलं वार्धक्य व्यतितकरा. म्हातारें होणं, म्हणजे दुबळं होणें नव्हे. शहाणं व ज्ञानसंपन्न होणं आहे. परंतु त्याचबरो बरहेही ध्यानात घतलें पाहिजे की शहाणपण ही काही वाढत्या वयाचीच मक्तेदारी नव्हे. काही बाल-तरुण माणसंदेखील तुमचं मागदर्शन करण्याइतकी शहाणी असतात. बाल-काच्या हातात मशाल असली म्हणून ती थोडीच कमी प्रकाश देते ? जो गवत खातो त्याला फळांची काय चव ? त्याचप्रमाणे जो क्षुद्र कलांत पारंगत होण्याचा प्रयत्न करतो, त्याला जीवनाची महान कला कशी कळणार ? जीवनाची कला ही सर्व कलांत महान कला आहे.

स्त्रीच्या बाबतीत मात्र वेमनाचं मन पूर्वग्रहानं आंधळं बनलेलं आहे. सद्गुणी, समृद्ध आणि हेतुपूर्ण अशा आपल्या कल्पनेतल्या जीवनविश्वात, वेमनानं तिला हीन, तिरस्करणीय स्थान दिलेलं आहे. त्याच्या दृष्टीनं स्त्री हे सर्व पापाचं आगर आहे. पुरुषाच्या विनाशाला कारणीभूत होणारी ती एक दुष्ट शक्ती आहे.* तिच्यापासून दूरच राहिलं पाहिजे. हे जर शक्य झालं नाही तर तिच्यावर कडक नियंत्रण ठेवलं पाहिजे. स्त्रीच्या सत्यवादित्वावर आणि एकनिष्ठेवर विश्वास ठेवणाऱ्याला मूर्खच म्हटलं पाहिजे. ‘ पाण्यावरील जहाजाच्या चाकोरीप्रमाणं, वाऱ्यामधील पाखराच्या

---

* पुरुषाच्या जिवनात ती ‘सर्स’ (ओडेसी काव्य) सारखी चेटकीण किंवा डेलीलासारखी पतीच्या मृत्यूला कारण होणारी मूर्ख स्वार्थी पत्नी. असत.

वाटेप्रमाणं स्त्रीचीही वाट अगम्य असते.' ऐश्वर्याच्या काळात स्त्री पतीची काळजी घेते, परंतु दुर्भिक्ष्याच्या काळात ती त्याचा मान ठेवणार नाही, जिवंतपणीच ती त्याला मृतवत् मानील. आईचा आदर केला पाहिजे. खरं म्हणजे साकार देवता मानून तिची पूजा केली पाहिजे, असं म्हणणाऱ्या वेमनाच्या मुखातून असे उद्‌गार बाहेर पडावेत हे फार विचित्र वाटते. स्त्रीची, विशेषतः पत्नीची निर्भत्सना तो करतो तेव्हा पत्नी झाल्याशिवाय स्त्रीला माता होता येत नाही या वस्तुस्थितीचं स्मरण त्याला राहात नाही, हे उघड आहे. ते कसंही असलं तरी हे स्पष्ट होतं की स्त्रीच्या बाबतीत तो प्रतिगामी नसला तरी अनुदार आहे. कँबेलनं या बबतीत वेमनाचं समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे. तो म्हणतो, ' भारतीय समाजात स्त्रिया या नेहमी सुधारणेच्या कट्टर शत्रू राहिल्या आहेत; आणि वेमनालादेखील सतत याच स्वरूपाचा अनुभव आला असेल. आपल्या उपजत, अनुदार दुर्धारकपणांमुळं आणि परंपरागत खोट्या समजुतीला आणि रूढीला आंधळेपणानं शरण जाण्याच्या त्यांच्या गुलामी वृत्तीमुळं वेमनाच्या प्रचारकार्यात खंड पडला असेल आणि कदाचित त्याचा तेजोभंगही झाला असेल. ' ही गोष्ट पुष्कळशी सत्य आहे हे मान्य केलं पाहिजे. परंतु स्त्रियांच्या या मागासलेपणाला पुरुषच प्रत्यक्ष जबाबदार नाहीत का ? त्यांनीच स्त्रियांच्या शिक्षणाला, स्वातंत्र्याला आणि जागृतीला शतकानुतके नकार दिला ना ? कोणतंही राष्ट्र, अर्धं स्वतंत्र आणि अर्धं गुलाम, अर्धं सुशिक्षित आणि अर्धं अशिक्षित, अर्धं जागृत आणि अर्धंनिद्रिस्त अशा अवस्थेत राहू शकतं का ? अशा राष्ट्रात त्याचा दुसरा अर्धा भाग अचेतन ओझं बनून राहिला आणि पहिल्या अर्ध्या भागाला (सचेतन भागाला) गर्तेत ओढू लागला तर त्याचा दोष पहिल्या भागालाच स्वीकारला पाहिजे.

वेमना हा वेदाचा अधिकार अमान्य करीत असला तरी तो स्वतः धार्मिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने वेदांतीच आहे. तो म्हणतो, ' वारांगनेप्रमाणे वेद तुम्हाला मोहवितात आणि तुमची दिशाभूल करतात. ' अर्थ न जाणता वेदपठण करणाऱ्या वेदपाठकांविषयी त्याच्या मनात मुळीच आदर नाही. तो त्यांना ' भुंकणारी कुत्रीं ' म्हणतो. पुढं तो म्हणतो, ' त्याचं पठण कदाचित त्यांच्या कंठस्नायूसाठी उत्तम व्यायाम ठरत असेल, पण त्याव्यतिरिक्त त्याचा दुसरा कसलाही उपयोग नाही. वैदिक विधीदेखील असेच निरुपयोगी आहेत, आणि पुराणं तर, ' असत्याची खिचडी ' आहे. पुराणांच्या प्रेरणेमुळं निर्माण झालेली मूर्तीपूजा तर या मूर्तिपूजकांना आंधळे बनवून सोडते. शिल्पित पाषाणाच्या मूर्तीवर श्रद्धा ठेवणारे लोक ' अज्ञानी, मूर्ख, बुद्धिहीन, माथेफिरू ' आहेत. भव्य मंदिरं बांधून त्यात मूर्तीची प्रतिष्ठापना करणारे राजे युद्धांत पराजित झाले, मेले आणि मूर्तिभंजक देशावर राज्य करीत आहेत.

या मूर्ती जर देवता होत्या तर त्यांनी आपल्या भक्तांचं रक्षण का केलं नाही ? तथाकथित धर्मशास्त्राचे ग्रंथ न्यायाऐवजी उघड उघड अन्यायाचे ग्रंथ आहेत. या ग्रंथांवर आणि त्यांच्या पुस्तकी शहाणपणावर विश्वासून राहाणं व्यर्थ आहे. परमेश्वराचा प्रत्यक्ष साक्षात्कार जर अनुभवता आला, तर तो खराखुरा महत्त्वाचा आहे. तोच एक मुक्तीचा मार्ग आहे.

जास्त खोलात न शिरता आपल्याला असं म्हणता येईल की, वेमनाचे धार्मिक तत्त्वज्ञान हे अद्वैतवादी आहे. परंतु इतर अद्वैतवाद्यांपासून तो वेगळा आहे. हे वेगळेपण, ही मतभिन्नता वेदांचा व धर्मग्रथांचा अधिकार अमान्य करण्यापुरतीच मर्यादित नाही, तर जीवात्मा आणि परमात्मा यांच्या स्वरूपाबद्दलही त्याचे काही मतभेद आहेत. ' ब्रम्हदेवाचा वध करा, आणि त्याला विष्णूत विलीन करा. ' तो म्हणतो ' नंतर विष्णूचा खून करा आणि त्याला शिवस्वरूपात विलीन करा. त्या शिवाचीही शेवटी हत्त्या करा आणि त्याला स्वत:त विलीन करा. म्हणजे तुम्ही पूर्ण योगी व्हाल. ' दुसऱ्या कोणा हिंदु विचारवंतांनं असे विचार मांडण्याचं धैर्य दाखवलें आहे का ?

डॉ. जी. व्ही. कृष्णराव यांनी वेमनाच्या तत्त्वज्ञानाचं असं स्पष्टीकरण केलें आहे :—

' प्रत्येक जिवाच्या हृदयात वास करणारा ईश्वर हा माणसापेक्षा मुळीच वेगळा नाही. जेव्हा जिवाला अंतर्यामी, ईश्वराचा साक्षात्कार होतो, आणि आपली वासना व अहंकार निपटून काढून जेव्हा त्याच्या स्वरूपात तो स्वत:ला हरवून टाकतो तेव्हा तो जीव ईश्वराशी एकरूप होतो — नव्हे तो प्रत्यक्ष ईश्वरच बनतो. ज्यांना हे तत्त्व समजलं नाही ते मंदिरात आणि पवित्र स्थळात त्या ईश्वराला शोधतात. काही जण या जगाचा त्याग करतात आणि भविष्यकाळात व परलोकात त्याची प्राप्ती होईल या आशेनं देहदंड भोगतात, तपश्चर्या करतात. हा फार मोठा भ्रम आहे, असत्य आहे. त्या परमानंदाचं वरदान इथं त्याला प्राप्त झालं नाही तर, दुसऱ्या लोकात ते कसं मिळणार ? जे सत्त्व आरंभाला सापडत नाही ते अंताला कसं गवसणार ? म्हणून या ऐहीक जगाच्या पलीकडं आणि माणसापासून लांब तो अनंत ईश्वर आहे; असं मानणं चुकीचं आहे. तो इथंच, माणसांत आणि माणसांभोवतीच आहे. स्वत:तच त्याचा शोध घेतला पाहिजे आणि तिथंच त्याचा साक्षात्कार अनुभवला पाहिजे. त्याचा शोध घेणाऱ्या साधकाला ' आपल्या खेड्यातूनही बाहेर पडण्याचं कारण नाही, आता जंगलातले कोल्हे मोजायचे असले तर गोष्ट वेगळी. '

वेमना हा माणसाला सर्व सृष्टीच्या केंद्रस्थानीं पाहतो, त्याला सृष्टीचं केंद्रच मानतो. म्हणून त्याचं तत्त्वज्ञान हे मूलत: मानवतावादी आहे. डॉ. ईश्वर टोपा यानं

' संत वेमना : त्याचें तत्त्वज्ञान ' या पुस्तकात असें म्हटलं आहे की, त्याचं तत्त्वज्ञान प्रामुख्यानं ' आत्म्याचं संस्कृतीकरण ' ह्या तत्त्वावर आपलं लक्ष केंद्रित करतं. वेमना हा ' आत्मसंस्कृतीकरणाचा प्रवक्ता आहे ' असं तो म्हणतो. या मुद्याचें स्पष्टीकरण करताना तो पुढे म्हणतो, ' वेमनाची सांस्कृतिक कल्पना मनावतावादी तत्त्वाच्या पायावर आधारलेली आहे. आपल्या मानवी व्यक्तित्त्वाचं उदात्तीकरण करण्यासाठी माणसानं आपापल्या मार्गानं प्रयत्न केला पाहिजे. कोणतेही अमानवी घटक त्याच्या साह्याला येणार नाहीत, कारण त्याच्या चैतन्यशील व्यक्तित्वातच साऱ्या उदात्त शक्ती गुप्तपणे वास करीत असतात. मानवाच्या कल्याणासाठी, या मानवी गुणांचं, त्यांच्या संस्कृतीकरणाचं महत्त्व ओळखणं आवश्यक आहे. '

मानवी उपजत प्रेरणा आणि वासना यांना दडपून न टाकता, त्यांचं उदात्तीकरण केलं पाहिजे, हे सूत्र वेमनाच्या विचारप्रणालीचा गाभा आहे. प्राकृतिक मानवी जीवनाला चालना देणाऱ्या सर्व जैविक शक्तीचा उगम कामप्रेरणेत आहे असे वेमनानं स्पष्टपणे सुचविलं आहे. एका अर्थाने असं म्हणता येईल की, आधुनिक मनोविश्लेषणशास्त्राचा जनक जो फ्राईड त्याच्या तत्त्वविचाराची पूर्वसूचना वेमनालाही (नकळत) अंतःस्फूर्तीने मिळाली असावी.* तो म्हणतो, ' एकाखा सुंदर तरुणीला पाहून जी कामवासना तुमच्या मनात पेटून उठते, तिचं रूपांतर आध्यात्मिक भावनेत झालं पाहिजे. योगसाधनेत होणाऱ्या आत्मा-परमात्मा यांच्या मिलनाची तुलना त्याने स्त्री-पुरुषाच्या संभोगाशी केली आहे. हीच कल्पना दुसऱ्या ठिकाणी निराळ्या रितीनं तो व्यक्त करतो : ' माणूस आधी कामी झाला पाहिजे त्याशिवाय तो मोक्षकामी होऊ शकत नाही. ' या मुद्यावर भर देताना तो म्हणतो, ' कामवासनेनं पेटलेला पती जसा आपल्या पत्नीला कवटाळतो, त्याप्रमाणे योग्यानं ईश्वरमिलनासाठी धावलं पाहिजे. '

वेमना हा नागार्जुनासारखा बुद्धिमान नाही किंवा शंकराचार्यांसारखा तत्त्वज्ञ नाही, त्यामुळे त्याला महान तत्त्वज्ञ म्हणता येत नाही. तरीही त्याला स्वतःचं एक प्रकारचं तत्त्वज्ञान होतं आणि त्यात माणसाचा आणि त्याच्या जीवनाच्या सर्व अंगांचा समावेश झाला होता. दैनंदिन व्यवहाराचा आणि आध्यात्मिक जीवनाचा त्यात संबंध होता. तो तत्त्वविचार व्यावहारिक तसाच ध्येयनिष्ठ होता. ' भारताचं हृदय ' या पुस्तकात डॉ. एल्. डी. बार्नेट म्हणतो, ' मानवी जीवनाच्या कोणत्याही

---

* या मताशी मी सहमत नाही. फ्राईडचा कामतत्त्व विचार खचितच त्यापेक्षा वेगळा आहे.— भाषांतरकार.

अंगाकडं त्याचं दुर्लक्ष नव्हतं.' वेमनासंबंधी आणि त्याच्या मानवतावादी विचारसरणीविषयी तो असा अभिप्राय व्यक्त करतो : 'जेव्हा मानवजातीच्या उपदेशकांची आणि प्रचारकांची तुलना माणसाच्या अंतःकरणाचा शोध घेणाऱ्या व्यक्तीशी करण्याची वेळ येते, तेव्हा तेलंगणाच्या ह्या नम्र शेतकऱ्यापुढें ते महान व देदिप्यमान आत्मे खुजे वाटतात.'

* * *

# निर्भेळ आणि दुर्मिळ प्रतिभा

'खरी प्रतिभा कवींत दुर्मिळ असते तशी टीकाकारांतदेखील खरी रसिकता दुर्लभ असते.' — पोप.

सर्वांगीण दृष्टीनं विचार केला तर असं दिसून येईल की वेमना हा प्रतिभावान कवि होता आणि त्याच्या प्रतिभेची जातही अस्सल व दुर्मिळ प्रकारची होती. त्याचा जन्म एका अज्ञात खेड्यात झाला, परंतु आपल्या इवल्याशा घरकुलात त्यानं सर्व विश्वाचा समावेश केला. सुरवातीच्या दुराचारी जीवनानंतर, त्यानं आपल्या आयुष्यात कठोर संयम पाळला आणि तो संतपदाला जाऊन पोचला. त्याला पद्धतशीर शिक्षण मिळालेलं नव्हतं, तरी आपल्या भाषेवर त्यानं असामान्य प्रभुत्व संपादन केलं आणि त्या भाषेला स्वतःच्या प्रतिभेनें नवं सौंदर्य व सामर्थ्य प्रदान केलं. त्याला वाङमयीन महत्त्वाकांक्षा नव्हती तरी तो थोर कवी झाला. केवळ आपल्या कालाचाच नव्हे तर युगायुगाचा महाकवी बनला. त्याला आपल्या किंवा इतर देशांतील तत्त्वज्ञान-ग्रंथांचा परिचय नव्हता तरी त्यानं एका व्यापक व निर्भय तत्त्वज्ञानाचा प्रसार केला. ते तत्त्वज्ञान आधुनिक मानवतावादी विचाराला स्पर्श करण्याइतकं चपळ व दूरगामी होतं. त्यानं अनेक ध्येयवादी आघाड्यांवर एकाकी लढा दिला आणि अनेक मूर्तींचे भंजन करून, त्यांच्या जागी सत्याची स्थापना केली. मानवाला शृंखलामुक्त करण्या-साठी अनेक रूढ अंधश्रद्धांचा त्यानें चुरा केला. दोन पायांवर धावणारं ते एक वादळ होतं आणि त्यानं आपल्या प्रचंड वेगात, वाटेत आलेल्या सर्व वस्तू उडवून दिल्या. असं असूनही त्यानं बहुसंख्य जनतेचं प्रेम संपादन केलं होतं. कारण आपल्या गांभी-र्याला त्यानं चातुर्याची जोड दिली होती. आपल्या गहन तत्त्वविचाराला त्यानं विनोदानं रंजक केलं होतं आणि उपहास व व्यंग्योक्ति यांच्या मिश्रणानं आपल्या संदेशाला त्यानं चैतन्यशाली रूप दिलं होतं. त्यानं धर्माला अभ्यसनीय बनवलं आणि नैतिक बोधवचनांना त्यानं काव्याची शोभा व प्रतिष्ठा आणली.

युगायुगात एखादाच वेमना होऊ शकतो. कारण त्याच्या प्रतिभेनं त्याच्या व्यक्तित्त्वाला तसा वैशिष्ट्यपूर्ण व असामान्य आकार दिला होता. तरीही जगातल्या इतर थोर पुरुषांचे समान सद्गुण त्याच्याही अंगी होते. उदाहरणार्थ — बेकनची

सुभाषितमय शैली, अल्पाक्षरत्व आणि चमकदारपणा त्याच्यात होता; पण त्या लॉर्ड चॅन्सेलरची अनैतिकता त्याच्यात नव्हती. पोप कवीची ओघवती शैली आणि शब्दचातुर्य त्याच्यात होतं पण त्याचा रडकेपणा, चिडकेपणा त्याला वर्ज्य होता. स्विफ्टची उपहासाची शक्ती त्याच्यात होती, पण त्या उदास धर्मोपदेशकाच्या मनातील माणसांबद्दलच्या घृणेचा त्याला स्पर्श नव्हता. रूसोचा ज्वलंत प्रक्षोभ त्याच्यात होता, परंतु त्या फ्रेंच विचारवंताची अराजकतेची प्रवृत्ती त्याच्यात नव्हती. त्याचा कपटीपणा वगळून व्हॉल्टेर या विद्वान पंडिताचा उपरोध व निर्भयपणा त्याच्या अंगी होता. शॉचे चातुर्य, विक्षिप्तपणा व स्पष्टपणा तसेच उत्तरायुष्यातल्या टॉलस्टॉयचा नैतिकतेचा आग्रह आणि त्या कुटुंबवत्सल पुराणपुरुषाची विश्वात्मकता हीदेखिल त्याच्याजवळ होती. वेमनाचे विद्वेषी टीकाकार असं म्हणतील की त्याला पाहून आम्हाला एकाच व्यक्तीची आठवण होते आणि ती व्यक्ती देखील ऐतिहासिक नसून काल्पनिक आहे. ती व्यक्ती म्हणजे ' डॉन क्विक्झोट '. त्यांचं असं मत असलं तरी त्यांच्याशी मांडण करायची आम्हाला गरज नाही. ' दी कन्साईज ऑक्सफोर्ड डिक्शनरी'त ' क्विक्झोट ' या शब्दाची व्याख्या अशी केली आहे : उत्साही स्वप्नाळू, ध्येयवादी, स्वाभिमान व निष्ठा यांच्यापुढें व्यावहारिक लाभ किंवा स्वार्थ यांची यत्किंचितही पर्वा न करता, उच्च व अव्यवहारी ध्येयामागे धावणारा.' ही व्याख्या अंशत: वेमनाला लागू होते. तसं नसतं तर तो असा वैशिष्टयपूर्ण व असामान्य व्यक्तित्वाचा पुरुष झालाच नसता. पुष्कळदा त्यानं आपला तर्कवाद, आपला आग्रह आत्यंतिक टोकाला नेला. उदाहरणार्थ, — ह्या किंवा त्या पंथाच्या महंताची महावस्त्रं पांघरून कांही ढोंगी माणसं, धार्मिक गुरु, उपदेशक, महंत म्हणून मिरवू लागली हे पाहून त्यानं आपल्या आयुष्याच्या अखेरच्या पर्वात वस्त्राचा संपूर्ण त्याग केला होता. तो म्हणतो माणूस या जगात नागडयाने प्रवेश करतो आणि या जगाचा निरोप घेतानाही तो वस्त्रहीन अवस्थेतच परत जातो. म्हणून गमनागमनाच्या मधल्या काळात त्यानं वस्त्रांची उठाठेव का करावी ? त्याच्या विक्षिप्तपणाचं दुसरं उदाहरण म्हणजे त्याच्या मनाला पडणारा स्त्रियांचा मोह. वेमनाच्या या त्रुटींना आणि दोषांना द्यायचंच म्हटले तर विक्षिप्तपणा हे नाव देता येईल. परंतु त्यामुळंच त्याच्या व्यक्तित्त्वाभोवती आकर्षकपणाचं एक सप्तरंगी व चैतन्यमय वलय निर्माण झालं आहे.

आपल्या देशातील कवींमध्ये तमिळनाडूचा तिरुवल्लुवर, हिंदुस्थानी प्रदेशातला कबीर, आणि कर्नाटकाचा सर्वज्ञ या कवींशी वेमनाचं साम्य आढळतं. डॉ. जी. यू. पोप यांनी तिरुवल्लूवर यांचं वर्णन 'अखिल मानवतेचा शाहीर' या शब्दांनी केलं आहे. वेमनादेखील असाच एक शाहीर – मानवतेचा उद्गायक होता. फक्त त्याच्या काळात फरक आहे. दोघांच्या काळात पंधराशे वर्षांपेक्षा अधिक अंतर आहे. दोन

वेगवेगळ्या प्रदेशाचे ते रहिवासी आहेत; कदाचित दोन भिन्न धर्मविचारांचा त्यांनी प्रसार केला असेल; भिन्न भाषांत या दोघांनी लेखन केलं आहे; परंतु त्यांचा संदेश मात्र एकच आहे; — मानवाची एकता. ' सर्व माणसं जन्मानं समान आहेत. ' असं तो उद्‌गारतो, ' पुढं त्यांच्यात भेद निर्माण होतात, ते धर्म किंवा जात यांच्यामुळं नसून, चारित्र्यामुळं निर्माण होतात. 'जन्माने ते उच्च असले', तो पुढं सांगतो, 'पण पुढं चारित्र्यहीन झाले तर ते नीच होतील; आणि नीच जातीतली माणसं उच्च ध्येयाने प्रेरित झाली तर उच्च होतील, थोर होतील. वेमनादेखील अशाच प्रकारचे विचार अधिक प्रभावीपणाने मांडतो, हे आपण यापूर्वी पाहिलंच आहे. त्याची मानवाच्या एकतेची कल्पनाही अशीच भव्य, सर्वसमावेशक आहे. तो म्हणतो :

' एकाच ताटात वाढा,
या जगांतील सर्व माणसांना
एकाच ताटात त्यांना जेवू द्या,
विसरून आपले सर्व मतभेद; आणि
एकरूप होऊन एकत्र जगा
असा आशीर्वाद द्या त्यांना
आपले दोन्ही बाहू उभारून '

कबीराप्रमाणे वेमनादेखील ईश्वराच्या एकतेवर भर देतो. ' जो अल्ला आहे तोच राम आहे ' असे तो म्हणतो. ' अल्ला हा स्वयंपूर्ण आहे आणि तो परमेश्वर आहे. ' शिव आणि अल्ला त्याच्या दृष्टीने एकरूप आहेत. ईश्वराची एकता ही धर्माची एकता, जीवनातली एकता यांची सूचक आहे आणि वेमनादेखील कबीराप्रमाणे या सत्याचं समर्थन करतो. ' शरीरं भिन्न असली तरी त्यांना प्राणमय बनवणारं जीवन एकच आहे. ' असे वेमना उद्‌गारतो. 'अन्नाचे प्रकार वेगवेगळे आहेत, पण क्षुधा एकच आहे. गाईंचे रंग निरनिराळे असतात; पण त्यांच्या दुधाचा रंग पांढराच असतो. अलंकार अनेक आकार-प्रकारचे असतात, पण ज्यापासून ते तयार केले जातात ते सोनं एकच आहे. भाषा भिन्न असतात, पण विचार एक असतो. वंश, धर्म वेगवेगळे आहेत पण जन्म एक असतो. विविध प्रकारची फुले असतात पण पूजा एक आहे. तत्त्वज्ञ, अनेक आहेत पण ईश्वर हे तत्त्व एक आहे.' वेमनाची एकतेची कल्पना मोठी व्यापक आहे. सर्व सजीव प्राणी आणि निर्जीव वस्तू यांनाही ती आपल्या कवेत घेते.

मूर्तिपूजेच्या निषेधाच्या बाबतीतदेखील दोघांचं एकमत आहे. ' दगडा-धोंड्याची पूजा करून परमेश्वरप्राप्ती होत असेल तर मग मी डोंगराची पूजा करीन' असं कबीरानं म्हटलं आहे. ' पाषाणांना सुंदर वस्त्रांनी सुशोभित करून आणि मंदिरात

बसवून, त्यांना अन्नोदकाचा नैवेद्य कशासाठी दाखवायचा ? तुमच्याजवळ जे काही आहे ते सर्व त्यानं दिलेलं आहे मग तो तुमच्या सर्वस्वाचा दाता, तुमच्याकडून त्यांची परत अपेक्षा कशी करील ? असा प्रश्न वेमनानं विचारलेला आहे. विशेषतः शैवांना उद्देशून वेमना म्हणतो, ' पाषाणाच्या बैलाची (नंदीची) तुम्ही पूजा करता आणि जिवंत बैलांना तुम्ही उपाशी ठेवता, त्यांना वाईट रितीनं वागवता, यापेक्षा अधिक विकृती ती कोणती असणार आहे ? सजीव प्राण्यांत वसणाऱ्या चैतन्याची पूजा करायची सोडून, या निर्जिव दगडांची तुम्ही कशाला पूजा करता ? ' धर्माच्या बाह्य आचाराचा उपहास करणाऱ्या कबीराची बरोबरी वेमनाही करतो.' पाण्यात बुडी मारल्यानं मोक्ष मिळत असेल तर बेडूक अहोरात्र पाण्यातच राहतात,' असे कबीर म्हणतो. पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणे वेमनानं देखील अशीच समान कल्पना मांडली आहे. हे दोघे एकमेकांना परके होते, परंतु जीवनाकडे बघण्याची दोघांची दृष्टी एकच असल्यामुळं आणि जीवनात समान प्रश्नांना त्यांना तोंड द्यावं लागल्यामुळं, त्या दोघांनी समान सत्याचा, तत्त्वाचा प्रचार व प्रसार केला. कबीर आणि तिरुवल्लुवर या दोघांपेक्षाही वेमना प्रवृत्तीनं, विचारानं आणि अभिव्यक्तीच्या शैलीमुळं कर्नाटकाच्या सर्वज्ञाच्या अधिक जवळ जातो. त्या दोघांत दुसरीही अनेक साम्यं मोठ्या प्रमाणात आहेत. तारुण्यांत दोघेही विषयलंपट होते दोघेही देवदासींच्या बरोबर विषयोपभोगांत मग्न झाले होते. नंतर दोघांनीही कंटाळून त्यांचा त्याग केला. दोघांनीही तडकाफडकी जीवनातील सुखोपभोगांचा त्याग करून, विरक्त धार्मिक जीवनाला सुरुवात केली. तरीही त्यांच्या मनांतून देवदासींचा विचार नष्ट झाला नाही. समाजातल्या दुष्ट व क्रूर रुढीला बळी पडलेल्या असहाय दुर्दैवी स्त्रियांवर टीका करण्याची एकही संधी ते वाया घालवीत नाहीत. दोघेही स्त्रियांच्या बाबतीत पूर्वग्रहाने अंध झालेले (Blind Spot) होते. वेमना आणि सर्वज्ञ यांच्यापैकी कोण आधी होऊन गेला, कोण उत्तरकालीन होता, हा प्रश्न अजून अनिर्णित आहे. परंतु या दोन्ही कवींच्या काव्याचं संशोधन करणाऱ्या रालापल्लीचं म्हणणं असं आहे की, वेमनाचा प्रभाव सर्वज्ञावर पडला होता असा तर्क करण्यास बरीच जागा आहे. उलट प्रकार असण्याची शक्यता त्यामानाने कमी आहे. ते कसंही असलं, आणि त्यांच्यात अनेक साम्यस्थळं असली तरी, त्यांचं काव्य म्हणजे परस्परांच्या नकला किंवा प्रतिध्वनी आहेत असं मात्र मुळीच म्हणता येणार नाही. वेमनापेक्षा सर्वज्ञ हा अधिक वास्तववादी होता, त्याचं व्यावहारिक ज्ञान अधिक होतं आणि काही मूलभूत कल्पनांवर आणि तत्त्वांवर भर देण्याच्या बाबतीत त्यांच्यांत बरीच भिन्नता होती.

बंगालचे एक आधुनिक अभ्यासू विद्वान विनयकुमार सरकार यांनी आपल्या ' हिंदु समाजशास्त्राची प्रत्यक्षवादी पार्श्वभूमी ' (Positive Back-Ground of

Hindu Sociology) या ग्रंथात असा अभिप्राय व्यक्त केला आहे :

'तमिळ कुरळ काव्यातल्या भक्तिपंथातला अखिल विश्वाच्या कल्याणाचा विचार (EGALITARIANISM) वेमनानं आपल्या काव्यात इतका पुढं नेला, की जवळपास क्रांतिकारक असं स्वरूप त्याला प्राप्त झालं. जातिभेदामुळं निर्माण झालेल्या समाजातल्या दोषांवर केलेल्या त्याच्या हल्ल्यापेक्षा, संपत्तीच्या मालकीहक्कांतून निर्माण झालेल्या विषमतेवर चढविलेला त्याचा हल्ला आणि त्यातला उपहास कमी वास्तववादी, कमी प्रखर, किंवा कमी क्रांतिकारक नाही. हिंदु प्रत्यक्षवादी तत्त्वज्ञानातील त्याचं स्थान अधिक मोठं नसलं तरी कबीर, चैतन्य इत्यादी संतांच्या बरोबरीचं आहे.'

असं असलं तरी तिरुवल्लुवर, कबीर व चैतन्य या कवींपेक्षा वेमनाचं नाव जगात लोकांना अधिक अज्ञात आहे. तेलुगु भाषेतील वाङमयीन मठाधीशांनी त्याला विस्मृतीच्या गर्तेत लोटण्याचा प्रयत्न केला, त्याचाच हा मुख्यतः परिणाम आहे. शेवटी त्यांचा जो पराभव झाला, तो त्या पंडितांनी हे प्रयत्न थांबविले म्हणून नव्हे, तर दुबॉय, ब्राऊन, मॅकडोनाल्ड, गोव्हर, कँबेल, ग्रियर्सन या पाश्चात्य संशोधकांनी त्यांचं कारस्थान हाणून पाडलं म्हणून हे घडू शकलं. परंतु तिरुवल्लुवरला राजाजी आणि कबीराला रवीन्द्रनाथ टागोर यांच्यासारखे समर्थ अनुवादक लाभले तसे अनुवादक अजून वेमनाला लाभलेले नाहीत ही खेदाची गोष्ट आहे. असामान्य निष्ठा बाळगूनही ब्राऊनला वेमनाला संपूर्ण न्याय देता आलेला नाही. कारण तो विदेशी आणि ख्रिस्ती होता. त्याच्या या परकीय पार्श्वभूमीमुळं त्याला वेमनाच्या काव्याच्या अंतरंगात शिरता आलं नाही. शिवाय भाषेतील सूक्ष्म सौंदर्य (अर्थच्छटा) त्याला आकलन झालं नाही. उदाहरणार्थ, वेमनाच्या एका पद्याचा हा अनुवाद पहा : 'पुण्यशील माणसाच्या पाठीवर पुटकळी उठली तर त्याचा गावभर गाजावाजा होतो, परंतु एखाद्या गरीबाच्या घरी लग्नसोहळा झाला, तरी कोणी त्याकडं लक्ष देत नाही.' इंग्रजी आविष्कारातल्या काही सवलती बाजूला ठेवून असं म्हणता येईल की, या पद्यात कवी पुण्यशील आणि गरीब माणसाची तुलना करीत आहे असा समज करून देऊन ब्राऊननं वेमनावर अन्याय केला आहे. असा मूर्खपणाचा प्रकार करण्याइतका वेमना हा अकुशल कवी नाही. त्यानं 'पुण्यमुगलवाडु' असा शब्द उपयोजिला आहे आणि त्याचा अर्थ पुण्यशील असा होतो. परंतु गतजन्मीच्या पुण्यशील पण योग भ्रष्ट माणसालाच श्रीमंताच्या घरी जन्म लाभतो या हिंदु रूढ समजुतीची माहिती ज्याला असेल, तो त्या शब्दाचा अर्थ श्रीमंत माणूस असाच करील. पूर्वी जो अभिप्राय व्यक्त केला आहे त्याची पुनरुक्ति करून असे म्हणणे भाग आहे की, ज्यानं वेमनासाठी इतके कष्ट उपसले त्याच्या दोषांवर टीका करणं उद्धटपणाचं (अकृतज्ञतेचं) लक्षण मानावं

लागेल. त्याबरोबरच अशी इच्छा मला व्यक्त करावीशी वाटते, की त्याच्या काव्याचा परिचय बाहेरच्या जगाला इंग्रजीतून करून देण्यासाठी एखादे राजाजी किंवा एखादे रवीन्द्रनाथ वेमनासाठी जन्मास आले पाहिजेत. ' एका गूढवाद्याचं चिंतन ' या नावाखाली मीर महमूद खान यानी वेमनाच्या निवडक पद्याचा जो इंग्रजी अनुवाद अलिकडेच प्रसिद्ध केला आहे तो ब्राऊनपेक्षा अधिक चांगला आहे. परंतु ' तेलुगु भाषेचं पुरेसं ज्ञान नसल्यामुळं त्या भाषेतल्या सूक्ष्म अर्थच्छटा आणि वेमनाची काव्यशैली यांचं पूर्ण आकलन करता येत नाही ' असं खान यांनी स्वत:च मान्य केलं आहे.

त्याच्या काव्याचा अनुवाद करण्यासाठी जसे एखाद्या राजाजी किंवा रवीन्द्रनाथांची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणे त्याचं व्यक्तिचित्र ( PORTRAIT ) तयार करण्यासाठी एखाद्या राफेल अगर रेंब्राची गरज आहे. या चित्रकारांच्या तोडीचा कलावंतच त्याच्या डोळयांतली तेजस्विता किंवा त्याच्या ओठावरील उपहासगर्भ स्मित आणि त्याच्या चालण्यातली चपलता (आपल्या कुंचल्यानं) पकडू शकेल अशा थोर कलावंतालादेखील त्याच्या व्यक्तित्वाच्या विविध पैलूंचं दर्शन घडविण्यासाठी एक चित्र काढून भागणार नाही तर त्याला एक चित्रमालिकाच रंगवावी लागेल. वेमना एका क्षणी अत्यंत मृदू मवाळ दिसतो, तर दुसऱ्या क्षणाला अत्यंत कठोर दिसतो आणि पुढच्याच क्षणाला प्रेमळ, वनदेवतेसारखा खोडकर आणि मुलासारखा निरागस भासतो. प्रत्येक बदलत्या भावावस्थेप्रमाणे त्याच्या चेहऱ्याचे भावच तेवढे बदलत नाहीत, तर त्याच्या शरीराच्या प्रत्येक स्नायूत बदल घडून येतात. मोजून, मापून प्रत्येक शब्दाचं वजन तोलणाऱ्या, प्रत्येक अभिव्यक्तीला घासून पुसून चकचकीत करणाऱ्या आणि मुद्दाम धीरगंभीर शब्दाचा कृतक उपयोग करणाऱ्या सर्वसामान्य कवींच्या मालिकेत तो बसत नाही. त्याचप्रमाणे इतर तत्त्वज्ञांपासून आणि प्रेषितांपासूनही तो फार निराळा आहे. उच्चासनाची किंवा हस्तीदंती मनोऱ्याची त्याला गरज नाही. बाजारातल्या एखाद्या चौकात उभा राहून तो जनतेशी मोकळेपणाने संभाषण करतो आणि त्या संभाषणातून तो आपला संदेश लोकांना देतो. त्याच्यावर धोंड्यांचा मारा केला काय, किंवा त्याच्यामागे कुत्री लावली काय, त्याची त्याला पर्वा नसते. कुत्र्यासंबंधीचे त्याचे उपहासाचे उद्गार इतक्या विपुलतेने आढळतात की त्याच्यावर खरोखरच ती सोडण्यात आली असावीत, असं वाटतं. सॉक्रेटीस किंवा ख्रिस्त यांच्याविषयीची माहिती त्याच्या कानावरून गेली नसेल. पण प्रेषिताला त्याच्या समाजात आणि काळात मान मिळत नाही, हे सत्य त्याला निश्चितच अज्ञात नव्हतं. एका पद्यात त्यानें असे उद्गार काढले आहेत की, परसात वाढलेल्या औषधी वनस्पतीप्रमाणे प्रेषिताला त्याच्या समाजात कोणीही आदराच्या भावनेनं पाहत नाही.

वेमना हा अनेक दृष्टींनी एक असामान्य कवी, तत्त्वज्ञ आणि प्रेषित होता आणि सर्व देशांसाठी एक सार्वकालीन संदेश त्यानं मागं ठेवला आहे. नैतिक संकटात सापड-लेल्या दिशाहीन अवस्थेत भरकटत निघालेल्या आणि मुळापासून उपटलेल्या आजच्या निराधार जगाच्या संदर्भात त्या संदेशाला मोठा अर्थ आहे. माणसं माणसाप्रमाणे जगू लागतील तर या जगाचा स्वर्ग होईल असे उद्‌गार त्यानंच काढले नाहीत काय ? आपल्या ऐहिक जगाचा तिरस्कार करून पुराणकथेतल्या स्वर्गासाठी तळमळत राहणं हा मूर्खपणा नाही काय ? असा प्रश्न पुढे जाऊन त्यानेंच विचारला नाही काय ? ज्या भूमीवर आपण उभे आहोत तीच जागा या जगातील सर्वांत पवित्र जागा आहे असा निर्वाळा त्यानंच दिला नाही काय ? त्याचा धर्म मानवतेचा धर्म आहे. माणसा-माणसातलं परस्पर प्रेम, समजूतदारपणा आणि ऐक्य सुरक्षित ठेवणं, वाढवणं' हे त्याचं स्वीकृत कार्य आहे आणि मानव समाजात जागतिक बंधुभाव स्थापन करणें हे त्याचं अंतिम ध्येय आहे. अशा रीतीनं आस्तिक–नास्तिक या दोघांनाही देण्या-सारखा एकच संदेश वेमनाजवळ आहे. त्याच्या शिकवणुकीचे सर्व सार या त्याच्या तेजस्वी उक्तीत साठवलं आहे, ' जो आपल्या बरोबर चालणाऱ्या सहप्रवासी माण-साच्या दु:खाचा विचार करतो त्याच्याच अंगी स्वत:ला माणूस म्हणवून घेण्याची लायकी असते. '

* * *

# पदावली

कवितेची गुणवत्ता अनुवादामध्ये कमी होते. अनुवाद कितीही चांगला झाला असला तरीही नाद, लय आणि त्या भाषेची इतर सूक्ष्म सौंदर्ये पूर्णपणे त्यात आणता येत नाहीत. वेमनाच्या पद्याचा जो अनुवाद इथं उद्धृत करण्यात येत आहे. तो वाचताना ही वस्तुस्थिती लक्षात घेणं आवश्यक आहे. चार्लस् ई. गोव्हर यांनी वेमनाच्या कवितेचा पद्यानुवाद केला आहे, तर चार्लस फिलिप ब्राऊन यांचा गद्य अनुवाद आहे. या अनुवादात वेमनाच्या शैलीचं सौंदर्य तर प्रत्ययास येत नाहीच, पण त्याच्या रचनेची नाद, लय, अल्पाक्षरता आणि सुभाषितांचा चटकदारपणा हे गुणही आढळत नाहीत. असं असलं तरी, त्याच्या काव्याला सौंदर्य आणि सामर्थ्य प्रदान करणाऱ्या प्रमुख गुणांचा, त्याच्या सामर्थ्याचा, ज्यात विजेची दाहकता आणि मेघांची घनगंभीर गर्जना एकवटली आहे त्या सामर्थ्याचा – किंचित प्रत्यय या अनुवादांमधून येईल अशी अपेक्षा आहे.

०००

**खोटाधर्म :**

(अभंग)

पठण श्रवण । वेदांचे करिती
पापीच राहाती । परी अंती
कोळसा कितीही । दुधाने धुतला
वर्ण त्याचा काळा । जाईचना
असती अनेक । धर्म जगतात
परी सारे व्यर्थ । श्रद्धेविणा
श्रद्धा हाच खरा । धर्माचा आधार
श्रद्धेने ईश्वर । संतोषतो
अखंड अभ्यास । शास्त्रांचा करून
शोधिती गहन । धर्मतत्त्वें

मृत्यूभय त्यांना । परंतु छळिते
मरावे कसे ते । कळेचिना
लिंपिता आपुले । भस्माने सर्वांग
गळ्यामध्ये लिंग । बांधुनिया
होतसे समृद्धी । ऐहिक सुखाची
वाट अन् मोक्षाची । बुजतसे
' नीच तू ओंगळ । नको शिवू मला '
करिती गलबला । अहंकारें
माणसांत भेद । कसा रे निर्मिता
अधिकार तत्त्वता । कोणी दिला ?
पापाचे मंदिर । प्रत्येक देहात
कोण पंकमुक्त । जन्मे येथे

**मूर्तिपूजा :**

अज्ञानी हे प्राणी । पूजिती पाषाण
देव लाथाडून । अंतरीचा
माणसांहुनिही । थोर हे पाषाण
भजन कीर्तन । चाले त्यांचे
शिलांच्या मूर्तीत । देवाची वसती
थोर भ्रम चित्ती । तुमच्या हा
पाहेना ऐकेना । निर्जीव जी मूर्ती
स्थापणे योग्य ती । मंदिरी का ?
मातीच्या मूर्तींना । मानुनि ईश्वर
पूजिता साचार । भक्तीभावे
सर्वभूतींचा जो । खरा भगवंत
जाता तुडवीत । आंधळ्याने
हातोड्याने शिला । फोडून तासून
आकार देऊन । मानवाचा
तुम्ही त्या मूर्तीस । पूजिता भजता
याहून कोणता । मूर्खपणा ?
जिवंत बैलास । उपाशी मारिता
नंदीस पूजिता । दगडाच्या

हिंसक क्रूर हे । तुमचे अज्ञान
पाप ते याहून । दुजे काय ?
पूजनीय देव । वसे अंतर्यामी
पूजिता का तुम्ही । दगडांना
केवळ पाषाण । आत नि बाहेर
करी का स्वीकार । नैवेद्याचा ?

**जात :**

जन्माने समान । जगीं जन सारे
देवाचीं लेकरें । बंधुबंधु
जन्माने जातीनें । अन्नसेवनाने
माणसें न हीनें । होती कधी
श्रेष्ठ हे कसे । जातीचे बंधन
वाहता अज्ञान– । पुरामध्ये
शूद्रा मानी हीन । तोच हीन क्षुद्र
नरकाचे दार । खुले त्याला
कशाचा आधार । निंदाया, वानाया
वाद सारा वाया । जातींचा हा
एकच ते मूळ । जातीचे सगळ्या
देणार निर्वाळा । कोण त्याचा ?
आमच्यासारिखा । अस्पृश्यही देख
मांसाचा तो एक । पुतळाच
कसे त्याला मग । हीन मानिता रे
तिरस्कारिता रे । कसे त्याला ?
तुमच्या आमच्या । वसे जो हृदयी
जात त्याची काय । पुसा जरा !

**मृत्यू :**

मरता धनिक । मागे त्याचे धन
राहाते पडून । साठलेले
मिळवावे लागे । पुन्हा त्याला धन
जन्मता फिरून । जगात या

कुठे त्याचा आत्मा । कुठे त्याचे धन
चतुर शहाणे । सांगा कोणी
लोखंडाची कांब । मोडता, लोहार
जोडितो साचार । पूर्वीपरी
गड्यांनो, तुटता । प्राणाचे ते तंतु
जोडील परंतु । कोण पुन्हा ?
मोडे जुनी वस्तु । घेतो ना नवीन ?
तसेच मरण । माणसाचे
देह जीर्ण होता । आत्म्यास वाहन
घेतसे नवीन । आत्माराम
दीर्घायु संपत्ती । विद्या कला कीर्ती
सर्वांची दिनांती । माती हाती
आप्त मित्रजन । पुत्र प्रिय पत्नी
सांगाती ना कोणी । अंतकाळी
धरावा विश्वास । कसा सेवकांचा
त्यांच्या साह्याचा । मृत्यूक्षणीं ?

**सुगृहिणी** :
पवित्र ते घर । पत्नी गुणशीला
दीप उजळला । अंधारात
प्रथम पत्नीचा । जेथे अधिकार
पवित्र मंदिर । ईश्वराचे
विवाहापूर्वीची । प्रीतीची ती वेल
वाढेल चढेल । मांडवावरी
फुलांनी फुलेल । फळांनी फळेल
स्वतः सुखावेल । सुखवोनी
नाही सोने नाणे । घराची संपत्ती
बालकें श्रीमंती । खरी गृही
बाळपणी तसे । वृद्धापकाळात
नांदती घरात । प्रेमैक्याने
वावरते लक्ष्मी । त्यांच्या पावलांनी
स्वर्ग या भुवनी । अवतरे

पत्नी पतीवरी । खरे प्रेम करी
वसते त्या घरी । सुखशांती
कर्कशा गृहीणी । करी शांतिभंग
बरा तिचा संग । सोडलेला
साईहुनि मृदु । गोड मधाहुनि
इक्षुदंडाहुनि । मधुर जे
पिकलेले पेरू । फणसाचे गरे
तसा शब्द झरे । गृहिणीचा

## दुष्टपत्नी :

अवज्ञा करिती । पतीची ज्या स्त्रिया
सर्पिणीच जाया । मृत्यूमुखी
जात्याच राक्षसी । छळाया पतीला
स्त्रीयोनीं झाला । जन्म त्यांचा
लाटात मिटते । पायटी नौकांची
वाट पाखरांची । वाऱ्यामध्ये
स्त्रियांच्याही वाटा । अगम्य तैशाच
सांगता नयेच । कोणालाही
पत्नीच्या प्रेमाने । पती तो श्रीमान
लोपता ते जाण । दरिद्री तो
निष्प्रेम जीवनी । नावाचा तो पती
मृतच गणिती । स्त्रिया त्याला
प्रेमाने संतुष्ट । पतीला जी करी
भूषण ती नारी । भूमिलागी
काही स्वार्थावीण । दिसेना जियेला
नारी ती पतीला । मृत्यूपाश
कर्कशा ज्या जाया । जाया न जगात
शृंखला पायात । पुरुषांच्या
गर्गशा पत्नीच्या । सहवासाहुनि
निवास विजनी । बरा देवा

**द्विज :**

अस्पृश्य जे होते । स्वतः जन्मताना
रक्ताच्या नात्यांना । निंदितात
माने मिरवती । द्विज म्हणवूनी
सुरक्षित स्थानी । समाजात
पाप जोपासती । पातकी ते मनी
हीन हीनाहुनि । अंत्यज ते
बहिष्कृतांना जे । उपेक्षिती जगी
तेच अंतरंगी । बहिष्कृत
द्विज काय होई । जातीजन्मयोगें
ज्याच्या मनी वागे । नित्य पाप
' आम्ही धर्मज्ञानी । ब्राह्मण पवित्र
शास्त्रपारंगत । भूदेव की '
असे ते सांगती । आणि उपेक्षिती
आम्हा हीनयाती । म्हणोनिया
सकळ वाचाळ । या पंडितांहून
आम्ही दीन हीन । बरे देवा
यज्ञोपवीत ते । करिता धारण
गेले शूद्रपण । मानी द्विज
कसा तो विसरे । नष्ट होय साचे
ब्राह्मणत्त्व त्याचे । मरताना
लोखंडी लंगोट । कटीस लावून
संन्यास घेऊन । वनी जाय
सेवी कडुरस । पक्वान्ने टाकोनी
जगे पशुवाणी । मोक्षासाठी

## बोधवचने

कामाचा आरंभ नका करू मंद; उरकतील ती लौकर कशी ?
घाईही तशीच फार बरी नही, फार कामे नासती घाईनेच
कच्चीच फळे तोडल्यावरती, मिळतील गोड फळे कशी ती ?

पाण्यात नावा डौलात डुलतात, सरसर जातात
हालतात न परी एक तसूभर जमिनीवरती
कौशल्यवंताला यश मिळते फक्त आपल्या क्षेत्रात
हत्तीलाही ती मारिते सुसर, प्रवेशताना आपल्या डोहात
क्षुद्र कुत्रेही लोळविते तिला, काठावरती आली जर ती
प्रत्येकाचे एक बलस्थान असते ज्याच्या त्याच्या जीवन–परिघात

बारा बारा पिले डुकरीण पिले
एकच छावा परी हत्तिणीला
समर्थ जन्मतो एखादा युगात असाच जाणा

चोरीत नाही गुरू कधी विद्या योग्य बुद्धिमान शिष्यापासून
शक्य होत नाही ज्ञानदान कधी मूर्खाला करणे जगात कोणाला
वाकडा तिकडा ' नदीचा प्रवाह ' सरळ करील कोण बळिवंत ?

निष्क्रिय पोकळ माणूस सदा घमेंडीमध्ये बडबड करतो
उत्तम पुरुष मौनच राहातो, तोलून मापून मोजके बोलतो
सोन्याचा कधीही होत नाही नाद पितळेच्या घंटा घणाणती अखंड

विशाल प्रवाह गंगेचा शांत सदाच संथ असतो वाहात
अल्पजीवी पण गढूळ ओढा उड्या मारीत खळाळत जातो
नीच वृत्तीचे लोक नसतात सज्जनासारखे अबोल शांत
असत्यवाद्यांची सज्जनांसारखी जगात उन्नती कशी होईल ?
दैवाचे सहाय्य नसते त्यांना, वैभवही त्यांना प्राप्त होत नाही.
फुटका पोहरा, शेंदून पाणी रांजण तुमचा भरेल कसा ?

## माणूस आणि ईश्वर

जो स्वतःच हे विश्व होतो आणि सर्व विश्व आपल्यात विचरत आहे हे जो जाणतो; तसेच अखिल बाह्य वस्तुजाताशी आपल्या अंतर्यामीचे नातं जोडण्याची कला ज्याला साध्य झालेली असते, त्या माणसाला या पृथ्वीवरचं पूर्णत्व प्राप्त झालेलं असतं.

जा, जाऊन सांगा, वामनाचा मी धिःकार करतो, ब्रम्हृयासकट विष्णूची आणि शिवाचीही निर्भर्त्सना करतो. मी केवळ एकाच परमेश्वराला मानतो.

जो आपल्या आईला जाणतो, तोच ईश्वरालाही जाणतो.

स्वर्ग आणि पृथ्वी यांचे रहस्य ज्याला कळलं आहे, त्यालाच आत्मज्ञान होतं.

ब्रह्मा हा कोणाचा मुलगा आहे ? विष्णू कोणाचा पुत्र आहे आणि हा शिव तरी कोणापासून जन्मला आहे ? ह्यांना देव समजणारे सारे अज्ञानी आहेत.

जगात अनेक धर्म-पंथ असतील पण ते सर्व अशाश्वत आहेत. या जगात सत्य एकच आहे. सर्व धर्मपंथांचा आणि धर्ममतांचा त्याग करून एकाच ईश्वराची उपासना करणं; यात हे सत्य अंतर्हित आहे.

अहिंसा हा परमोच्च आचार आहे, असे भूदेव-ब्राह्मण उच्चरवाने सांगतात आणि यज्ञात स्वतःच पशुवध करतात. त्यांच्यापेक्षा मेलेल्या जनावरांचे मांस खाणारे चांडाळ बरे.

माणसे दगडाला शिवाचं रूप देतात. दगड हे दगडच असतात, ते कधीच शिव होऊ शकत नाहीत. आमच्यात वास करणाऱ्या शिवाची आम्हाला का बरं ओळख पटत नाही ?

निष्ठा अढळ असेल तर एकपत्नीव्रताचं पालन करणाऱ्या माणसाप्रमाणे तुझे ज्ञानही अद्वैतमार्गीच असेल. या जगाच्या स्वामीप्रमाणे तुझ्या हृदयाचा गाभारादेखील प्रकाशाने भरलेला असेल.

देव आपल्यापासून दूर आहे अशी तुझी भावना असेल तर तो तुझ्यापासून दूरच राहील. हा देहच त्याचे निवासस्थान आहे, अशी तुझी श्रद्धा असेल तर तो तिथे वसतीला येईल, आणि आपलं हे जीवन त्याचं वाहन आहे अशी निष्ठा तू बाळगलीस तर देवाप्रमाणे तुलाही शाश्वतपद प्राप्त होईल.

त्याच्याजवळ चांदी-सोन्याचे डोंगर आहेत हे खरे आहे, तर मग तो शिव भिक्षा मागत का फिरतो ? माणूस कितीही मोठा झाला तरी त्याला शेजाऱ्याच्या मालमत्तेचें आकर्षण वाटतं !

अजूनही ते या जगाला माया म्हणतात, का ? पण ती माया नाही. ती माया असेल तर तो परमेश्वर कुठं आहे ? कुठं सापडेल ? ते मला सांगा.

जीवनातील सुखांचा त्याग केल्यानं लाभ होईल असा जे उपदेश करतात ते ढोंगी आहेत. या आमच्या ऐहिक जीवनातच स्वर्गलोकीची प्रभा झळाळत आहे, हे तुम्हाला दिसत नाही काय ?

* * *

# परिशिष्ट – १

# संदर्भग्रंथ

(वेमनासंबंधीच्या निवडक तेलुगु व इंग्रजी पुस्तकांची यादी)

तेलुगु भाषेत वेमनाचे चरित्र-ग्रंथ फारच थोडे आहेत. त्यांपैकी बहुसंख्य पुस्तकांत त्याच्या जीवनातील लोकप्रिय दंतकथांनाच स्थान मिळालं आहे. या दंतकथांच्या तपशीलात थोडाफार फरक करून, त्या निरनिराळ्या चरित्रग्रंथात समाविष्ट करण्यात आल्या आहेत. म्हणून या प्रकारच्या फक्त एक-दोन चरित्रांचाच या यादीत समावेश करण्यात आला आहे.

वेमनाच्या काव्यावरही अनेक टीका व भाष्यं उपलब्ध आहेत. या साऱ्या टीकाग्रंथांत त्याच्या गूढ कवितेचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे आणि तो सारा खटाटोप बव्हंशी निरर्थक आहे. म्हणून त्यांचा येथे समावेशच करण्यात आला नाही. वेमनाचे काव्यसंग्रहही अनेक आहेत. काही महत्त्वाच्या संग्रहांचा येथे उल्लेख केला आहे. वेमनावरील ग्रंथांची तीन भागात वर्गवारी केली आहे. तेलुगु, तेलुगु-इंग्रजी आणि इंग्रजी.

### ० तेलुगु ०

(१) वेमना योगीन्द्र चरितमु : लेखक–आर. पूर्णय्याचारुलु, मछलीपट्टण १९१३

(२) वेमनासुक्तिरत्नाकरमु (४०३५ पद्ये) संकलक : आर. पूर्णय्याचारुलु, मछलीपट्टण–१९१३.

(३) श्री वेमना योगी जीवितमु : लेखक – पंचाग्नुला आदिनारायणाशास्त्री, वाबिल्ला रामस्वामी शास्त्रुलु ॲण्ड सन्स, मद्रास–१९१७.

(४) पोतन्ना, वेमनाला युगमु : ले. दिग्वल्ली वेंकट शिवाराव–१९२४.

(५) महायोगी वेमना कवी : ले. नेदुन्री गंगाधरम्, सी. व्ही. कृष्णा बुक डेपो, मद्रास (प्रकाशन वर्षाचा उल्लेख नाही)

(६) वेमना ज्ञानमार्ग-पद्यमुलु : (३००२ पद्ये), सी. व्ही. कृष्णा बुक डेपो, मद्रास, (प्रकाशन वर्षाचा उल्लेख नाही.)
(७) वेमना (सर आर. वेंकटरत्नम् स्मारक व्याख्यानमाला) व्याख्याते : राला-पल्ली अनंत कृष्णा शर्मा, आंध्र विद्यापीठ, वाल्टेर १९४७ (दुसरी आवृत्ती)
(८) कवित्वतत्त्व-विचारमु : ले. सी. आर. रेड्डी, आंध्र विद्यापीठ वाल्टेर, –१९४७ (दुसरी आवृत्ती)
(९) वेमना : ले. वांगुडी सुब्बाराव, कमला कुटीर, नरसापुरम्–१९५१ (दुसरी आवृत्ती)
(१०) शतकवाङ्मयसर्वस्वमु (खंड पहिला) वेदम् वेंकट कृष्णा शर्मा मद्रास –१९५४.
(११) वेमनाचा पद्यसंग्रह – टीपांसहित (२७२८ पद्ये) वाविल्ला रामस्वामी शास्त्रुलु अॅण्ड सन्स, मद्रास–१९५५ (दुसरी आवृत्ती)
(१२) शतककवुलु चरितमु : वांगुडी सुब्बाराव. कमला कुटीर, नरसापुरम (आवृत्ती १९५७)
(१३) वेमनापद्यमुलु (५०१० पद्ये) संपादक, नेदुन्री गंगाधरम्, अड्डेपल्ली आणि कंपनी, राजमहेंद्री–१९६०.
(१४) वेमना नीतिपद्य – रत्नावली (१११६ पद्ये) जी. व्ही. कृष्णा बुक डेपो, मद्रास–१९६१ (द्वितीयावृत्ती)
(१५) आंध्रकवितरंगिणी (भाग ६) : चगंती शेषय्या, हिंदुधर्मशास्त्र ग्रंथ-निलयम्, कपिलेश्वरपुरम् (आवृत्ती १९६१)
(१६) समग्र आंध्र साहित्यम (खंड १२) : आरुद्र शेषाचलम् आणि कंपनी, मद्रास–१९६८.

### ० तेलुगु – इंग्रजी ०

(१) दी व्हर्सेस ऑफ वेमना (६९३ पद्ये) अनुवाद : सी. पी. ब्राऊन, व्ही. रामस्वामी शास्त्रुलु अॅण्ड सन्स, मद्रास–१९११ (द्वितीयावृत्ती)
(२) व्हर्सेस ऑफ वेमना (मूळ तेलुगु कविता आणि त्यांचा इंग्रजी अनुवाद) (१२१५ पद्ये) अनुवादक : सी. पी. ब्राऊन, आंध्र प्रदेश साहित्य अकादमी हैद्राबाद–१९६७.
(३) दी म्यूझिंग्स ऑफ ए मिस्टिक : मीर महमूद अली खान, हैद्राबाद–१९६६.

### ० इंग्रजी ०

(१) हिंदु मॅनर्स, कस्टम्स् अँड सेरीमनीज : जे. ए. डुबॉय, ऑक्सफोर्ड,–१९५३ (द्वितीयावृत्ती)

(२) वेमना, ए साऊथ इंडियन पोएट : विलियम हॉवर्ड कॅंबेल, मद्रास ख्रिश्चियन कॉलेज, मॅगेझिन.–१८९८.

(३) वेमना : आर. एम. मॅकडोनाल्ड, मद्रास जर्नल ऑफ लिटरेचर अँड सायन्स, –१८६६.

(४) दी फोक सॉंगस् ऑफ सदर्न इंडिया : चार्लस् ई. गोव्हर, हिगिन बॉथम अॅण्ड कंपनी, मद्रास, १८७१.

(५) सम माईलस्टोन्स इन तेलुगु लिटरेचर (भाग २) : दी एज ऑफ वेमना : जी. आर. सुब्रम्हय्या पंतुलु, बी. नरसिंहेश्वर गुप्ता, मद्रास–१९१५.

(६) तेलुगु लिटरेचर : पी. टी. राजू, पी. इ. एन्. मुंबई–१९४४.

(७) तेलुगु लिटरेचर : पी. चेंचय्या आणि राजा एम. भुजंगराव कलकत्ता (सन नाही)

(८) ऑन वेमना : सी. आर. रेड्डी; रेडिओ - भाषण, आकाशवाणी, मद्रास, –१९५०.

(९) सेंट वेमना : हिज फिलॉसॉफी – ईश्वर टोपा, हैद्राबाद तेलुगु अकादमी, हैद्राबाद–१९५०.

(१०) वेमना : हिज पोएट्री अॅण्ड फिलॉसॉफी : जी. व्ही. कृष्णराव (हाफ वे या ग्रंथात प्रकाशित, श्री. व्ही. आर. नार्ला यांना त्याच्या ५१ व्या वाढदिवसा-निमित्त भेट)–१९५८.

(११) दी हार्ट ऑफ इंडिया : एल. डी. बार्नेट, लंडन–१९२४.

(१२) वेमना : दी तेलुगु पोएट अॅण्ड सेंट : सी. रामकृष्णराव, जी. ए. नटेशन अॅण्ड कंपनी मद्रास (प्रकाशनवर्ष नाही).

(१३) वेमना थ्रू वेस्टर्न आईज : संकलन व संपादन — व्ही. आर. नारला, एम्. शेषाचलम् आणि कंपनी, मद्रास–१९६९.

* * *

## परिशिष्ट – २

# * टीपा आणि स्पष्टीकरणें

**अभिनव गुप्त** : (सुमारे इ. स. १०००) भारतीय तत्त्वज्ञ आणि काव्यशास्त्रज्ञ.

**अडंकी** : गुंटूर जिल्ह्यातील एक खेडं. याचा भूतकाळ वैभवसंपन्न होता. प्रोलय्या वेमा या रेड्डी राजाचं हे खेडं राजधानी होतं. (चौदावं शतक).

**अद्वैत वेदांत** : अद्वैतवादी तत्त्वज्ञान. श्री. गौडपादाचार्य यांनी या तत्त्वज्ञानाचा पाया घातला आणि श्रीशंकराचार्य हे या तत्त्वप्रणालीचे प्रभावी व तेजस्वी प्रचारक व समर्थक होते.

**अलंकार शास्त्रे** : ' काव्यशास्त्रावरचे प्रबंध ' असे विंटरनिट्झ यांनी त्यांचं वर्णन केलं आहे. ते म्हणतात, ' एक शास्त्र या दृष्टीनं, फार प्राचीन काळापासून भारतात काव्यशास्त्राचा विकास करण्यात आला, परंतु हे विकसित शास्त्र इतकं पुढं आक्रमक बनलं की त्यानं साह्य करण्याऐवजी कवींचा मार्गच रोधला. '

**अमरकोष** : संस्कृत शब्दकोषातला सर्वात लोकप्रिय कोष. अमरसिंह या बौद्ध पंडितानं या कोषाची रचना केली. विंटरनिट्झच्या मताप्रमाणे हा विद्वान इसवी सनाच्या सहाव्या आणि आठव्या सनाच्या मधल्या कालखंडात होऊन गेला. ह्याचे तीन भाग असून तो समानार्थक शब्दांचा कोष आहे. या कोषावर जवळ जवळ पन्नास टीकाग्रंथ उपलब्ध आहेत.

**आंध्र** : आंध्र आणि तेलुगु हे दोन्ही शब्द समानार्थक असून, ते विशिष्ट प्रदेश, तिथले लोक आणि त्यांची भाषा यांचे निदर्शक आहेत. आंध्र हे फार प्राचीन भारतीय रहिवासी आहेत. ' ऐतरेय ब्राह्मण ' या प्राचीन उपनिषद् ग्रंथात त्याचा उल्लेख सापडतो.

---

* या अनुवादात टिपांची रचना अकारविल्यानुसार केली आहे. मूळ इंग्रजी पुस्तकात इंग्रजी अल्फाबेटस्प्रमाणे ती आहे.

त्यांची भाषा द्राविड वंशातली आहे. भारतीय किंवा युरोपीय वंशापेक्षा ती वेगळी आहे. भारतीय संघराज्याच्या सतरा घटक राज्यांपैकी आंध्र एक राज्य आहे. त्याचे क्षेत्रफळ २७५२८० चौरस किलोमीटर्स असून १९६१ च्या शिरगणतीप्रमाणे तिथली लोकसंख्या ३५९८३४७७ इतकी आहे.

**आंध्र साहित्य परिषद** : एक साहित्य संशोधनविषयक कार्य करणारी संस्था. पहिल्यांदा १९११ साली ती मद्रास येथे स्थापन करण्यात आली. त्यानंतर तिचं कार्यालय जे ग्रंथालय, त्यांचं काकीनाडा येथे स्थलांतर करण्यात आलं. पिठ्ठापुरमचे दिवंगत महाराज श्री राव वेंकटकुमार महिपती सूर्याराव हे या संस्थेच्या आश्रयदात्यांपैकी अत्यंत उदार व प्रमुख आश्रयदाते होते. या ग्रंथालयात सुमारे पांच हजार ताडपत्रांवर लिहिलेले ग्रंथ आहेत.

**अप्प कवी** : व्याकरणकार व छंदशास्त्रकार. इसवी सनाच्या सतराव्या शतकात ककुनरी अप्प कवी झाला असावा असं मानलं जातं. नन्नय्याच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या 'आंध्र शब्दचिंतामणी' या संस्कृत ग्रंथाचा अनुवाद करताना या ग्रंथकारानं त्यात स्वतःच्या माहितीची बरीच नवीन भर घातली आहे.

**अरुंधती** : वसिष्ठाची पत्नी. आदर्श पत्नी म्हणून तिचा मान, आदर केला जातो. ती अस्पृश्य होती. एका नक्षत्रालाही ते नाव आहे.

**इनाकोंडा** : (खरा उच्चार विनू कोंडा) हे शहर आणि किल्ला यांना इतिहासात उल्लेखनीय स्थान आहे. सध्याच्या गुंटूर जिल्ह्यात ते एक तालुक्याचं गाव आहे.

**उपनिषद** : एकूण दोनशेपेक्षाही अधिक उपनिषदं आहेत. ह्या ग्रंथात तत्त्वज्ञानाची चर्चा केलेली असून, त्यांची गुणवत्ता व विस्तार यांच्या बाबतीत त्यांत भिन्नता आहे. त्यातली काही रचना छंदोबद्ध आहे. तर काही उपनिषदं गद्यात रचलेली आहेत. बुद्धपूर्व कालापासून अगदी आधुनिक काळापर्यंत उपनिषदांचा रचनाकाल पसरलेला आहे. त्यात अल्लोपनिषद व ख्रिस्तोपरिषद यांचाही समावेश आहे. त्यांत समान वैचारिक भूमिकेला विरोध करणाऱ्या कोणत्याही तत्त्वज्ञानाची पद्धतशीर मांडणी केलेली नाही. त्यांचं स्वतंत्र असं कांही तत्त्वज्ञानच नाही. उपनिषदांविषयी डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् यांनी

असा अभिप्राय व्यक्त केला आहे : ' विशिष्ट तात्त्विक सिद्धांत प्रस्थापित करावा असा उपनिषदांचा उद्देश नाही. त्यात पुष्कळ विसंगत आणि अशास्त्रीय गोष्टींनाही स्थान मिळालं आहे.' ए. बी. कीथ यांचं मत अधिक परखड आहे. ते म्हणतात, ' (उपनिषदांतील) या तत्त्वविचारांना ऐतिहासिक महत्त्व आहे. तत्त्वज्ञान म्हणून त्यांचा विचार करणं शक्य नाही.'

**उर्वशी** : स्वर्गातील एक अप्सरा. तिच्या असामान्य रूपसौंदर्यानं आकर्षित झालेल्या कालीदासानं तिच्यावर एक सुंदर नाटक लिहिलं असून, कविवर्य रवीन्द्रनाथ ठाकूर यांनी तिला अनुलक्षून एक उत्कृष्ट काव्य रचलं आहे. पुराणकथेनुसार वसिष्ठ आणि अगस्ती यांची ती माता आहे असं समजण्यात येतं.

**एर्रा प्रगादा - एडपाटी** : दुसऱ्या श्रेणीचा एक तेलुगु कवी. सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात तो झाला असावा. काहींच्या मतं त्याचं आडनाव एडपाटी नसून, पेद्दापती आहे. त्याच्या जन्मस्थानाविषयी देखील इतिहासकारांत भिन्न मतं आहेत. ' मल्हन्नाचरित ' हा त्याचा ग्रंथ सर्वांत अधिक प्रसिद्ध आहे. विजयनगरचा सम्राट कृष्णदेवराय याला हा ग्रंथ अर्पण करण्याचा त्याचा मूळ विचार होता. पण पुढं त्यानं तो ग्रंथ तत्कालीन प्रसिद्ध मुत्सद्दी कलयमंत्री याला अर्पण केला. त्याचा दुसरा ग्रंथ, ' कुमार नैषधम् '. मध्ययुगीन पंडितांनी छंदशास्त्राच्या संदर्भात या ग्रंथाचा अनेकदा उल्लेख केला असला तरी तो आज उपलब्ध नाही.

**कंडानूल** : कर्नूलचं जुनं नाव

**कडप्पा** : रायलासीमा भागातल्या शहराचं व जिल्ह्याचं नाव.

**कर्नूल** : रायलासीमा भागातल्या जिल्ह्याचं ठिकाण. या गावावरून जिल्ह्याचंही तेच नाव पडलं. १९५३ ते १९५६ या काळात आंध्र प्रदेशाच्या स्थापनेनंतर आणि विशाल आंध्र प्रदेशाच्या निर्माणापूर्वी, हे शहर आंध्र राज्याची राजधानी होतं.

**कबीर** : मध्ययुगीन भारतातला एक श्रेष्ठ गूढवादी संतकवी. त्याच्या जन्मतिथिविषयी पंडितांमध्ये वाद आहेत. तसेच त्याच्या मृत्यूदिवसाचा प्रश्नही वादग्रस्त आहे. परंतु बहुसंख्यांच्या मताप्रमाणे इसवी सनाचं पंधरावं शतक हा त्याचा काळ मानण्यात येतो. त्याचे आईवडील कोण होते याबद्दलही भिन्न भिन्न मतं

आहेत. कोणी म्हणतात की तो मुसलमानाचा मुलगा होता, तर कोणी असे मानतात की ब्राह्मण विधवेनं टाकलेला तो पोरका पोर होता आणि मुसलमान मातापित्यांनी त्याचा प्रतिपाळ केला. व्यवसायानं तो विणकर होता, रामानंदाचा शिष्य होता. धर्मातील कर्मठपणा त्याला मान्य नव्हता. परमात्मा हा अल्ला आहे की राम आहे याची चर्चा न करता एकाच ईश्वराची उपासना करावी असा उपदेश तो लोकांना करीत असे.

**काकतीय साम्राज्य** : इसवी सनाच्या अकराव्या शतकातल्या प्रारंभीच्या दशकात बेटराजू यांनी या साम्राज्याची स्थापना केली. वरंगल ही त्याची राजधानी होती. सन १३२२ मध्ये दिल्लीचा सुलतान गियास-उल्-दीन तुघलक याचा मुलगा उलूक खान यानं काकतीय सम्राट प्रतापरुद्र, याचा युद्धात पराभव केला आणि त्याला कैद केलं. या युद्धात वरंगलची राजधानी व काकतीय साम्राज्य नष्ट झालं. आपल्या उत्कर्षकाळात हे साम्राज्य दक्षिण भारतात त्रिचनापल्लीपर्यंत पसरलं होतं.

**कालीदास** : भारतीय कवी आणि नाटककार. त्याच्या कलाकृतीत, संस्कृत अभिजात काव्य आणि नाट्य साहित्याचा विकास कळसाला पोचला, असं सामान्यपणे मानण्यात येतं. त्याच्या जन्माची आणि मृत्यूची तिथी निश्चितपणे माहीत नाही. परंतु गुप्त काळात इसवी सनाच्या चवथ्या किंवा पाचव्या शतकाच्या सुरुवातीला तो होऊन गेला असे समजलं जातं. त्याचं अत्यंत प्रसिद्ध नाटक म्हणजे शाकुंतल; आणि मेघदूत ही त्याची उत्कृष्ट काव्यकृती आहे. इंग्रजी धरून अनेक भाषांत त्याच्या कृतीचे अनुवाद झाले आहेत.

**कर्नाटक** : कन्नड आणि कर्नाटक या शब्दांचा एकच अर्थ आहे. आंध्र या शब्दाप्रमाणेच तो शब्द विशिष्ट लोक, प्रदेश आणि भाषा यांचा निदर्शक आहे. आंध्राच्या नैऋत्येला, या कानडी लोकांचं म्हैसूर हे स्वतःचं राज्य आहे.

**कोंडावीडू** : एका गावाचं, किल्ल्याचं आणि प्रदेशाचं नाव. महाराजा अनावोता वेमा रेड्डी (सन १३५३–१३६४) याची आणि त्याच्या वंशजांची राजधानी म्हणून या गावानं मध्ययुगीन

आंध्राच्या इतिहासात महत्त्वाची भूमिका बजावली आहे.

**कृष्ण** : वसुदेवाचा मुलगा आणि यादव वंशाचा प्रमुख. तत्त्वज्ञ आणि मुत्सद्दी या नात्यानं महाभारतात कृष्णाची फार मोठी व महत्त्वाची भूमिका आहे. तो भगवद्गीतेचा कर्ता होता. रामाप्रमाणेच विष्णूचा अवतार म्हणून त्याची पूजा करण्यात येते. सर्व हिंदु देवतांत त्याचं व्यक्तित्त्व मोठं आकर्षक, अद्‌भुत, आनंदी व खेळकर आहे. श्याम वर्णाचा हा देव पित्तांबरधारी असून तो मुरली वाजवून त्या मुरलीनादानं हजारो तरुणींची हृदयं आकर्षित करीत होता असं पुराणं सांगतात.

**कुरळ** : सर्वश्रेष्ठ तमिळ अभिजात काव्य. या कुरळ काव्याला तमीळ लोक वेदाप्रमाणे मान देतात. हा सूक्तिसंग्रह असून त्याचे तीन भाग आहेत. पहिल्या भागात सात्त्विकतेचा, दुसऱ्यात संपत्तीचा, राजकारणाचा आणि तिसऱ्या व शेवटच्या भागात प्रेमाचा विचार केलेला आहे. या ग्रंथात एकूण १३३० द्विपद्या आहेत. तिरुवल्लुवर हा त्याचा कर्ता आहे.

**गांधी** : मोहनदास करमचंद (१८६९–१९४८) आधुनिक संत व महात्मा. अहिंसक लढयाच्या मार्गानं त्यांनी भारताला स्वातंत्र्य मिळवून दिलं. ता. ३० जानेवारी १९४८ या दिवशी एका हिंदू आततताईच्या गोळीला ते बळी पडले.

**गंडी कोटा** : कडप्पा जिल्ह्यातील एक लहानसं गाव. त्या गावी एक किल्लाही आहे. पुराव्यानं सिद्ध न होणाऱ्या परंपरागत अनुमानाप्रमाण वेमाचा वडीलभाऊ या गावच्या किल्ल्याचा प्रमुख होता.

**गोदावरी** : भारताच्या द्विपकल्पातून वाहाणारी (दक्षिणेतली) सर्वांत मोठी नदी. गोदावरी नदी पश्चिम घाटात उगम पावते आणि पूर्व दिशेनं वाहत वाहत ती बंगालच्या उपसागराला जाऊन मिळते. अर्ध्यापेक्षा अधिक म्हणजे सुमारे ७२० किलोमीटर्स ती आंध्रप्रदेशातून वाहत जाते. आंध्रातलं एक महत्त्वाचं शहर राजमहेन्द्री हे तिच्या काठावर वसलं आहे.

**ग्रियर्सन, सर जॉर्ज अब्राहम (१८५१–१९४१)** : साहित्य क्षेत्रांतील अनेक सन्मानांनी व पदव्यांनी विभूषित असा ख्यातनाम विद्वान संशोधक. सन १८७३ साली, इंडियन सीव्हिल सर्विसमध्ये ते प्रविष्ट झाले आणि १९०३ साली निवृत्त झाले. संस्कृत व हिंदी या भाषांसहित अनेक भारतीय

भाषांचे ते तज्ज्ञ पंडित असल्यामुळं त्यांची भारताच्या भाषा-सर्वेक्षण मंडळावर अधीक्षक म्हणून नेमणूक करण्यात आली. या पदावरून त्यांनी संस्मरणीय कामगिरी केली आहे.

**गुंटूर** : हे जिल्ह्याचं मुख्य ठिकाण असून त्याचंच नाव जिल्ह्याला दिलं आहे.

**गुरु** : शिक्षक, उपदेशक, विशिष्ट संदर्भात नेता असाही याचा अर्थ होतो. ' दोंगाला गुरू ' म्हणजे चोर दरोडेखोरांचा पुढारी.

**चैतन्य** (१४८६–१५३३) : बंगाल प्रांतातला एक सर्वप्रख्यात संतकवी. आपल्या जीवनानं आणि उपदेशानं, बंगाल, ओरिसा, आसाम आणि इतर प्रांतांतील अनेक कवींना त्यानं आपल्या जीवनाद्वारें आणि उपदेशाद्वारें प्रेरणा दिली आहे. प्रेयसी जशी आपल्या प्रियकराला अनन्य भावानं अनुसरते तसं तुम्ही ईश्वराला शरण जा, हा त्याच्या उपदेशाचा मुख्य गाभा आहे. लक्षावधी चैतन्यसंप्रदायी लोक भारतभर विखुरलेले आहेत.

**जोन्स, (सर) विलियम** (१७४५–१७९४) : एक बुद्धिमान ब्रिटीश कायदेपंडित. सन १७८३ मध्ये कलकत्त्याच्या सुप्रिम कोर्टाचे न्यायाधिश म्हणून त्यांची नियुक्ती झाली. दुसऱ्याच वर्षी बंगाल एशियाटिक सोसायटी स्थापन करण्यात त्यांनी पुढाकार घेतला. अनेक युरोपीय भाषांचे ते स्वतः तज्ज्ञ होते. त्यामुळे त्यांनी तौलनिक भाषाशास्त्राच्या अभ्यासाला चालना दिली. ह्याशिवाय हिंदु आणि मुस्लिम कायद्यांवरील त्यांचे ग्रंथ आणि कालीदासाच्या नाटकांचे त्यांचे अनवाद प्रसिद्ध आहेत. हा बहुगुणी विद्वान अकाली मृत्यू पावला. त्यामुळं भारतीय संशोधनशास्त्राची (इंडॉलॉजी) फार हानी झाली.

**टागोर रवीन्द्रनाथ** (१८६१–१९४१) : कालीदास आणि भवभूती यांच्या नंतरचा महानं भारतीय कवी. सन १९१३ साली त्यांना साहित्याचे नोबेल प्राईज देण्यात आले.

**तमिळनाड** : हा तमीळ भाषिकांचा देश आंध्राच्या दक्षिणेस असून केप कामोरीनपर्यंत त्याचा विस्तार आहे. दक्षिणेतला हा सर्वांत समृद्ध, प्रगत प्रदेश. या प्रदेशाचं क्षेत्रफळ आंध्रापेक्षा कमी असले तरी त्याची लोकसंख्या ३,३६,८६९५३ आहे. (१९६१ ची जनगणना).

**तिकन्ना** : इसवी सनाच्या तेराव्या शतकातला एक कवी, आणि मुत्सद्दी. तेलुगु भाषेतला तो सर्वश्रेष्ठ कवी असून त्याला ' कविब्रह्मा ' असं संबोधिलं जातं. चौथ्या पर्वापासून आरंभ करून शेष सर्व महाभारताचा त्यानं तेलुगूत अनुवाद केला आहे. तो स्वत: तत्त्वज्ञ नव्हता, राजकारणी मुत्सद्दी होता. त्यानं भगवद्गीतेला फार संक्षिप्त रूप दिलं आहे आणि राजकारण आणि युद्ध यांचं वर्णन ज्यात आहे त्या भागांचा त्याचा अनुवाद उत्कृष्ट झाला आहे. त्याचा आश्रयदाता महाराज मनुमसिद्धी याच्या राज्याचं जेव्हा शेजारच्या राजानं हरण केलं तेव्हा या कवीनं वरंगलच्या गणपती देवाचं साह्य घेऊन त्या आक्रमकाला त्यानं हाकलून लावलं.

**तेलुगु** : आंध्रचा समानार्थक शब्द. इतर दोन शब्दांप्रमाणेच हा शब्द-देखील प्रदेश, जनता आणि त्यांची भाषा यांचा निदर्शक आहे. तेलुगु आणि आंध्र हे मूळचे एकच आहेत की भिन्न देशीय लोक आहेत हे इतिहासकारांना अजून निश्चितपणे सांगता आलेलं नाही.

**तेलंगण** : तेलुगु भाषिकांचा देश. (आंध्र) एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत युरोपियन लोक या प्रदेशाला 'तेलंगाना' या नावानं संबोधित असत. आता या नावानं निर्देशित होणाऱ्या प्रदेशात आंध्रात विलीनीकरण होण्यापूर्वीच्या हैदराबाद संस्थानातील फक्त नऊ तेलुगु जिल्ह्यांचाच समावेश आहे.

**तिरुवल्लुवर** : कुरळ या महाकाव्याचा कर्ता. हा जैन होता की नाही हे निश्चित-पणे माहिती नसलं, तरी तो खालच्या जातीचा होता हे निश्चित. ज्या नावानं तो ओळखला जातो त्याचा अर्थच याप्रमाणे होतो– ' वल्लुवर या जातीतला संत ' आणि वल्लुवर हे उच्च जातीचे लोक नाहीत. त्याचा काळ अनिश्चित आहे. निरनिराळ्या संशोधकांनी त्याला निरनिराळ्या शतकांत नेऊन ठेवलं आहे. हा काळ ख्रिस्तपूर्व पहिलं शतक ते ख्रिस्तोत्तर तिसरं शतक असा निर्देशिला जातो.

**तोडीराग** : एक सांगीतिक स्वरबंध, रागाचा एक प्रकार.

**दादू** : एक संत कवी आणि त्याच्या नावानं ओळखल्या जाणाऱ्या
(१५५४–१६०३) दादूसंप्रदायाचा संस्थापक. अहमदाबाद हे त्याचं जन्मग्राम.

पण त्यानं आपलं सारं आयुष्य राजस्थानात व्यतित केलं. काहींच्या मतानं तो ब्राह्मण होता तर काहीजण त्याला ब्राह्मणेतर जातीचा मानतात. त्याचा धंदा वंजाऱ्याचा होता.

**दंडिन्** : एक संस्कृत काव्यशास्त्रकार. त्याचा काल वादग्रस्त आहे. इसवी सनाच्या सातव्या शतकात बहुतेक तो होऊन गेला असावा. काव्यशास्त्रावरील ' काव्यादर्श ' या त्याच्या प्रबंधापेक्षाही त्याची गद्य अद्‌भुतरम्यकथा, ' दशकुमारचरितम् ' अधिक प्रसिद्ध आहे

**देवदासी** : शब्दशः अर्थ देवाची सेविका असा होतो. ज्या मंदिराला तिला अर्पण करण्यात येतं, त्याच्या देवतेची संगीत-नृत्याच्याद्वारं सेवा करणं हे तिचं काम. देवदासींना उपजीविकेसाठी इनाम जमिनी दिल्या जात होत्या. त्यांच्यावरचा सारा त्यांना माफ होता. पण अधिक संपत्ती मिळविण्याच्या लोभानं त्या देहविक्रयाच्या व्यवसायाची जोड आपल्या सेवाकार्याला देत होत्या. काही देवदासी निष्णात कलावंत, उत्तम नर्तिका व गायिका होत्या. देवाला तरुण मुली वाहण्याची जुनी प्रथा आता कायद्यानं बंद करण्यात आली आहे.

**दुबॉय ॲबी. जे.** : एक फ्रेंच धर्मोपदेशक. अंदाजे सन १७७० मध्ये जन्मलेला. जवळजवळ ३१ वर्षे तो दक्षिण भारतात ख्रिस्ती धर्मोपदेशक म्हणून काम करीत होता. स्थानिक पोशाखात आणि एत्तद्देशीय रीतिरिवाज पाळून तो सामान्य जनतेत मिळून-मिसळून, त्यांच्यातलाच एक होऊन राहात होता. ' हिंदु मॅनर्स, कस्टमस् व सणसमारंभ ' या त्याच्या ग्रंथावरून, १७९२ ते १८२३ या काळातल्या हिंदु समाजाचं वास्तव चित्र समोर उभं राहतं.

**धर्मशास्त्रें** : हिंदूंच्या कायदेविषयक ग्रंथांच्या समुच्चयाला दिलेलं नाव. त्यांना स्मृतीग्रंथ असे म्हणतात. हिंदु समाजाच्या जीवनाच्या विविध अंगांचं नियमन करणारे कायदे या स्मृतीग्रंथांत दिलेले आहेत. उच्चवर्णीयांची, ब्राह्मण पुरोहित वर्गाची धार्मिक सत्ता अबाधित ठेऊन, त्यांच्या विशेषाधिकारांचं रक्षण करण्यावर या स्मृतीनियमांत भर देण्यात आला आहे. निरनिराळ्या ऋषींनी हे स्मृतिग्रंथ रचले आहेत असा समज आहे. मनुस्मृति याज्ञवल्क्यस्मृती, पराशर स्मृती, गौतमस्मृती आणि आप-

स्तंभस्मृती हे प्रमुख स्मृतीग्रंथ आहेत. एकूण स्मृतींची संख्या सुमारे पन्नास आहे.

**नागार्जुन** : बौद्ध तत्त्वज्ञ. ' मानवजातीच्या श्रेष्ठ तत्त्वज्ञांत त्याची गणना करावी लागेल. ' असं मत सोव्हिएट रशियाच्या सायन्स अकादमीचे सदस्य प्रा. टी. एच. स्करबाट्स्की ( Prof. T. H. Stcherbatsky ) यांनी व्यक्त केलं आहे. इसवी सनाच्या पहिल्या शतकातल्या या तत्त्वज्ञानं बौद्ध तत्त्वज्ञानातील माध्यमिक संप्रदायाचा विकास केला. आंध्र प्रदेशातील श्रीपर्वताच्या भागात त्यांनी आपल्या आयुष्याची शेवटची वर्षं व्यतीत केली. आता हा भाग नागार्जुन कोंडा या नावानं ओळखला जातो.

**नामदेव** : (१२७०–१३५०) व्यवसायानं शिंपी असलेला महाराष्ट्राचा एक थोर संत आणि कवी. दहा वर्षं तो पंजाबात राहिला. त्याची काही भजनं शिखांचा धर्मग्रंथ ' ग्रंथसाहेब ' यात समाविष्ट झाली आहेत.

**नानक** : (१४६९–१५३६) शिख पंथाचा संस्थापक. त्या पंथाचा पहिला गुरु. तलवंडी या खेडेगावी त्याचा जन्म झाला. सध्या हे गाव पश्चिम पाकिस्तानात आहे. प्रेम आणि जागतिक बंधुभाव या तत्त्वज्ञानाचा प्रसार करीत देशभर त्यानं प्रवास केला.

**नन्नय्या** : इसवी सनाच्या अकराव्या शतकात तटवर्ती आंध्र प्रदेशावर राज्य करणारा, पूर्व चालुक्य वंशाचा राजा, राजराजा नरेन्द्र याच्या दरबारातला हा राजकवी. राजमहेन्द्री ही या राजाची राजधानी होती. या राजाच्या आज्ञेवरून नन्नय्यानं महाभारताच्या भाषांतराचं काम स्वीकारलं. परंतु हे कार्य पूर्ण होण्याच्या आधीच तो निवर्तला. महाभारताच्या पहिल्या दोन पर्वांचा आणि तिसऱ्या पर्वाच्या काही भागांचा अनुवाद त्यानं तेलुगु भाषेत केला. तेलुगु व्याकरण आणि इतर पाच ग्रंथ यांचं कर्तेपणही त्याच्याकडं देण्यात येतं. परंतु हा मुद्दा वादग्रस्त आहे. तेलुगु भाषेचा आदिकवी असाही एक दावा त्याच्या बाबतीत करण्यात येतो. पण त्याच्याबद्दलही वाद आहेत. उपलब्ध असलेला आद्य तेलुगु ग्रंथ नन्नय्याने लिहिलेला आहे म्हणून ' वागानुशासन ' (भाषेचा स्मृतिकार) असा त्याचा गौरव करण्यात आला आहे.

**नेल्लोर** : या शहराचं प्राचीन नाव विक्रमसिंहपुरम् असं आहे. सध्या ते नेल्लोर या नावानं ओळखल्या जाणाऱ्या जिल्ह्याचं मुख्य ठिकाण आहे.

**पाखंड** : नास्तिक, वेदाज्ञा न मानणारा.

**पूर्वकविस्तुती** : पूर्वी होऊन गेलेल्या कवींच्या स्मृतीला वंदन. प्रत्येक परंपरानुगामी काव्यकृतीत हा भाग आवश्यक मानला गला आहे. जीर्ण रूढीचाच हा एक प्रकार असला तरी त्यात एक हेतु चांगला आहे. त्यामुळे कधी कधी थोडासा ऐतिहासिक आधार मिळतो. या देशाला मोठा व दीर्घकालीन इतिहास आहे. पण त्याला इतिहासाची जाण फार कमी आहे. अशा देशात या गोष्टीलाही महत्त्व आहे.

**पोप** : एक ख्रिस्ती धर्मोपदेशक. परंतु तमीळ भाषेचा त्यानं सखोल व्यासंग केला होता. सन १८८६ साली लंडन येथे त्यानं 'कुरळ'चा अनुवाद प्रसिद्ध केला. त्यानंतर दुसरा अभिजात तमीळ ग्रंथ 'तिरुवसाहम' याचाही अनुवाद केला.

**प्रबंध** : काव्याचा एक प्रकार. त्यात नगरं, नद्या, पर्वत यांचं वर्णन, ऋतुवर्णन, वनं आणि सरोवरं यांची वर्णनं असली पाहिजेत. त्यातलं कथानक राजाराणी, राजपुत्र आणि राजकन्या यांच्याभोवती सतत फिरत राहिलं पाहिजे. विशेषतः त्यांच्या कामजीवनाचं विस्तारानं वर्णन आलं पाहिजे. त्याशिवाय मृगया आणि युद्धदेखील त्यात असणं आवश्यक आहे. या आवश्यक गोष्टींच्या सक्तीमुळे, कवी जर कुशल कलावंत नसेल तर प्रबंध—काव्य म्हणजे एक कृत्रिम व कंटाळवाणा प्रकार होतो.

**प्रभाकरशास्त्री वेत्तुरी** : **(१८८८–१९५०)** एक उत्तम वाङ्मयसंशोधक आणि समीक्षक. त्यांनी अनेक ताडपत्रांवर लिहिलेल्या ग्रंथांचं संपादन व प्रकाशन केलं आहे. काही अभिजात ग्रंथांना लिहिलेल्या त्यांच्या प्रस्तावना महत्त्वाच्या व अमोल आहेत.

**पोतन्ना** : **(१४००–१४७५)** बम्मेरा पोतन्ना तेलुगुचा एक श्रेष्ठ कवी आहे. त्यांनी महाभारताचं भाषांतर केलं आहे. एक साधा माणूस. पुष्कळसा व्यासंग त्यानं स्वतःच केला. राजाश्रय नाकारला आणि आपल्या साहित्यकृती त्यानं आपल्या आराध्यदेवतेला अर्पण केल्या.

प्रामाणिक भावना आणि माधुर्य हे त्याच्या काव्याचे विशेष गुण आहेत.

**पुराणे** : प्राचीन हिंदु लोकांच्या बखरी आणि दंतकथा यांचं संकलन. परंपरागत समजुतीप्रमाणे अठरा बृहत् पुराणं आणि अठरा उपपुराणं आहेत. पण वस्तुतः लहान पुराणांची संख्या अधिक आहे. सामान्यपणे हिंदुधर्माचे लोकप्रिय स्वरूप पुराणप्रणित आहे. विष्णुपुराणाच्या अनुवादाला एच्. एच्. विल्सन यांनी जोडलेली प्रस्तावना पुराणवाङ्मयाच्या उत्कृष्ट अभ्यासाचा संक्षिप्त नमुना आहे.

**बसव** : माणसांमाणसांत भेद निर्माण करणाऱ्या जाती, वर्ग आणि इतर कृत्रिम बंधनांविरुद्ध लढा देणाऱ्या धार्मिक चळवळीचा जनक. वीरशैव पंथाचा संस्थापक. बाराव्या शतकाच्या पूर्वार्धात बागेवाडी या गावी एका ब्राह्मण कुटुंबात तो जन्मला आणि भारतातला एक श्रेष्ठ व प्रख्यात धार्मिक व सामाजिक सुधारक झाला.

**बसवपुराणम्** : बाराव्या शतकात पालुकुरिकी सोमनाथ यांनी लिहिलेलं काव्यबद्ध बसवचरित्र.

**ब्रह्म** : हिंदु त्रिमूर्तीमधली एक देवता, सृष्टीचा विधाता. त्याचा वर्ण लाल असून त्याला चार मुखे आहेत. परंतु त्रिमूर्तींतील इतर दोन देवांप्रमाणे याची पूजा होत नाही.

**ब्रह्मसूत्रे** : तत्त्वज्ञानावरील चर्चात्मक ग्रंथ. या ग्रंथाचें जनकत्त्व व्यासाकडं देण्यात येतं. परंतु डॉ. एस्. एन्. दासगुप्ता यांच्या मतानं हा फार प्राचीन ग्रंथ नाही. 'या ग्रंथात भारतीय तत्त्वज्ञानाच्या सर्व तत्त्वप्रणालींचं आणि पद्धतींचं खंडन करण्यात आलं आहे. त्यावरून ही सूत्रं फार प्राचीन काळी रचण्यात आलेली नाहीत असा निष्कर्ष काढणं अपरिहार्य ठरतं,' असा त्यांचा अभिप्राय आहे. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात या ग्रंथाची रचना झाली असावी असा त्यांचा तर्क आहे. जाकोबीच्या मताप्रमाणे ब्रह्मसूत्रांचा रचनाकाल त्यापेक्षाही अलीकडचा आहे. इसवी सन २०० ते ४०० या कालखंडात या सूत्रांची रचना झाली असं त्यांचं अनुमान. ब्रह्मसूत्रांवरील भाष्यकारात शंकराचार्य, रामानुज आणि मध्वाचार्य हे तीन प्रमुख भाष्यकार फार प्रसिद्ध

आहेत आणि अगदी अलिकडचे भाष्यकार म्हणजे डॉ. एस्. राधाकृष्णन्. या भाष्यकारांवरही भाष्य लिहिणारे अनेक भाष्यकार आहेत.

**ब्राह्मण** : वर्णव्यवस्थेप्रमाणे समाजातला सर्वोच्च वर्ग ब्राह्मण. त्याला 'भूसुर' पृथ्वीवरला देव असेही म्हणतात. द्विज या शब्दानंही त्याचं वर्णन करण्यात येतं.

**ब्राऊन, चार्लस फिलिप** (१७९८–१८८४) : मद्रास सिव्हिल सर्व्हिसमधला एक अधिकारी. ब्राऊनचं तेलुगु जनतेवर, त्यांच्या भाषेवर आणि साहित्यावर फार प्रेम होतं आणि त्यानं त्याची निःस्वार्थ सेवा केली. तेलुगु भाषेचं व्याकरण, तेलुगु-इंग्रजी आणि इंग्रजी-तेलुगु शब्दकोष यांची त्यांनी रचना केली. त्याशिवाय त्यानं ताडपत्रावर लिहिलेल्या शेकडो तेलुगु ग्रंथांचं संशोधन व संग्रह केला आणि त्यांचा तौलनिक अभ्यास करण्यासाठी प्रोत्साहन दिलं. त्यांच्या प्रकाशनकार्यातही त्यानं साह्य केलं. अविश्रांत श्रम करून त्यानं वेमनाची वाङमयीन कीर्ती सुप्रतिष्ठित करणाऱ्या कार्याचा पाया घातला.

**भगवद्गीता** : ख्रिस्ती धर्मात 'नवा करार' ला (न्यू टेस्टामेंट) ज स्थान आहे तेच उच्च स्थान भगवद्गीतेला हिंदु धर्मात आहे. महाभारताची दोन प्रमुख पात्रं कृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादाच्या रूपात ही गीता, त्या महाकाव्यात समाविष्ट केलेली आहे. तिची एकूण श्लोकसंख्या ७०० आहे. गीतेचा पहिला इंग्रजी अनुवाद चार्लस् विलकिन्स (१७८४) यांनी केला. परंतु सर एडविन अर्नोल्ड यांनी केलेला इंग्रजी अनुवाद (दी सॉंग सेलेश्चियल) फार प्रसिद्ध आहे. गीतेवर जे शेकडो भाष्यकार झाले त्यात शंकराचार्य हे सर्वांत पहिले भाष्यकार आहेत आणि आधुनिक काळातले अगदी अलिकडचे भाष्यकार म्हणजे लोकमान्य टिळक, अरविंद आणि गांधी. 'भगवद्गीतेचं स्वरूप तत्त्वज्ञानापेक्षा धार्मिक प्रबंधाचं अधिक आहे' असे डॉ. एस. राधाकृष्णन् यांनी म्हटलं आहे.

**भरत** : पुराण काळातील एक ऋषी. त्यानं नृत्य, नाटक आणि नाट्य या कलांची निर्मिती केली असं मानण्यात येतं (नाट्यशास्त्रावर त्यानं प्रबंध लिहिला आहे.)

**भवभूती** : संस्कृत वाङ्मयातला, कालीदासानंतरचा एक सर्वश्रेष्ठ कवी आणि नाटकार. उत्तररामचरित, महावीरचरित आणि मालती-माधव या नाट्यत्रयींपैकी त्याचं पहिलं नाटक, ' उत्तर-रामचरित ' हे सर्वोत्कृष्ट आहे. त्याचा काल इसवी सनाचं आठवं शतक मानण्यात येतो. विदर्भात त्याचा जन्म झाला आणि राजाश्रयाच्या शोधात तो नंतर उज्जयिनीला किंवा काश्मीरला गेला असावा.

**भीम** : भीम किंवा भीमसेन. महाभारताचे नायक जे पंचपांडव त्यातला हा दुसरा राजपुत्र. हा महाकाय असून त्याच्या अंगी नऊ हजार हत्तींचं बळ होते. त्याची भूकही प्रचंड होती. भारतीय हर्क्युलस असं त्याचं वर्णन करता येईल.

**भोज** : अनेक हिंदु राजांनी हे नाव धारण केलेलं आहे. त्यांपैकी एक राजा धारचा नृपती होता. तो अकराव्या शतकात झाला. ' शृंगारप्रकाश ' या काव्यशास्त्रावरील ग्रंथाचा तो कर्ता. याखेरीज ' सरस्वतीकंठाभरण ' हा ग्रंथही त्याच्या नावावर प्रसिद्ध आहे.

**महाभारत** : रामायण आणि महाभारत ही दोन भारताची सर्वोत्कृष्ट संस्कृत महाकाव्यं आहेत. ' इलीयड ' आणि ' ओडेसी ' ही दोन महा-काव्यं मिळून जेवढा काव्याचा आकार होईल, त्यापेक्षा महाभारताचा आकार, सध्याच्या स्वरूपात, आठपटीने मोठा आहे. महर्षी व्यासांनी या महाकाव्याची रचना केली असं प्राचीन काळापासून परंपरेनं मानण्यात येतं. या महाकाव्याचा रचनाकाल अज्ञात आहे. परंतु काही संशोधक विद्वानांनी असा निष्कर्ष काढला आहे की ' ख्रिस्तपूर्व चौथं शतक आणि ख्रिस्तोत्तर चौथं शतक या काळाच्या दरम्यान या महाकाव्याची रचना झाली असावी. पुढं महाभारताला आजचं संकलित स्वरूप हळूहळू, यथाक्रम प्राप्त झालं असावं.' (एम. विंटरनिट्झ)

**महात्मा** : महान व्यक्ती असा या शब्दाचा अर्थ होतो. उच्च आध्यात्मिक प्रवृत्तीच्या व्यक्तीला आदरानं ' महात्मा ' असं म्हणतात. गांधी हे आधुनिक काळातले महात्मा होते.

**मुकुट** : राजाचं शिरस्त्राण, मथळा किंवा ध्रुवपद असाही त्याचा दुसरा अर्थ होतो.

**माला** : आंध्रातील अस्पृश्य वर्गातील दोन मोठ्या जाती, त्यांपैकी एका जातीला माला हे नाव असून दुसरी मादिगी या नावानं ओळखली जाते.

**मल्ले** : जाई किंवा मोगरा-पुष्प आणि वेल.

**मल्लिकार्जुन पंडित** : काकतीय सम्राट प्रोला दुसरा (सन १११०–५८) याचा समकालीन. हा एक थोर विद्वान आणि वादात निष्णात पंडित होता. आपल्या वादकौशल्यानं त्यानं बौद्ध पंडितांचा वादात पराभव केला. त्याचा 'शिवतत्त्वसार' हा ग्रंथ शैव तत्त्वज्ञाना-वरील एक चांगला ग्रंथ आहे. वाङ्मयदृष्ट्याही तो सरस आहे.

**मन्मथ** : याला कामदेवही म्हणतात. प्रेमाची-कामभावनची देवता. ग्रीक पुराणातील क्यूपिड किंवा इरॉस याला समान अशी हिंदु पुराणातील देवता. कामदेव हा चिरंतनाचा तरुण व सुंदर पुरुष असून, शिवाय अनंगही आहे. पोपट हे त्याचं वाहन आणि फुलांचं धनुष्य व बाण तो धारण करतो.

**मासुलीपटण** : हे तटवर्ती शहर असून कृष्णा जिल्ह्याचं मुख्य ठिकाण आहे. सतराव्या व अठराव्या शतकात पोर्तुगीज, डच आणि फ्रेंच साहसी व्यापाऱ्यांचा, राजकीय व आर्थिक वर्चस्वासाठी इथंच वारंवार संघर्ष झाला. मच्छलीपट्टण हे या नावाचं थोडंसं अपभ्रष्ट रूप आहे. प्राचीन ग्रीक भूगोलशास्त्रज्ञांनी या शहराचा 'मसालिया' किंवा 'मैसोलिया' या नावानं उल्लेख केला आहे.

**मूगाचिंतापल्ली** : हे खेडेगाव वेमनाचे जन्मस्थान आहे असं म्हणतात. परंतु नेल्लोर आणि गुंटूर जिल्ह्यात या नावाची दोन गांवं आहेत. तसंच कडप्पा आणि चित्तूर या जिल्ह्यांतदेखील या नावाचं प्रत्येकी एक गाव आहे. कोणत्या जिल्ह्यातलं गाव वेमनाचं जन्मस्थान आहे यासंबंधी संशोधकांत अजूनही वाद आहे.

**मुखर्जी, धूर्जटीप्रसाद** (१८९४–१९६१) : आंतरराष्ट्रीय कीर्तीचे समाजशास्त्रज्ञ. लखनऊ विद्यापीठाशी त्यांचा निकटचा संबंध होता. प्रखर बुद्धीचे, मौलिक प्रतिभेचे, तरल संवेदनशील वृत्तीचे, हे विद्वान आणि बंगाली व इंग्रजी या दोन्ही भाषेतले ते यशस्वी व प्रसिद्ध लेखक होते.

**यम** : ग्रीक देवता प्लूटो किंवा मिनोस यांच्याप्रमाणे हिंदु पुराणकथेतील मृत्यूची देवता आणि नरकलोकाचा स्वामी. त्याचा वर्ण हिरवा असून तो रक्तवस्त्रं धारण करतो. रेडा हे त्याचं वाहन.

**यज्ञोपवीत** : (सेक्रेड थ्रेड) हिंदुंच्या धार्मिक श्रद्धेप्रमाणे ब्राह्मण हा द्विज आहे आणि यज्ञोपवीत धारण करण्याचा संस्कार झाल्यानंतरच तो ब्राह्मण होतो. सुताचं तिपदरी जानवं (यज्ञोपवीत) धारण करण्याच्या विधीला व्रतबंधही म्हणतात. ब्राह्मणाप्रमाणे त्याच्या खालच्या क्षेत्रीय आणि वैश्य या दोन वर्णांतही यज्ञोपवीत धारण करण्याचा विधी आहे.

**रायदास** : पंधराव्या शतकातला एक संतकवी. व्यवसायानं चांभार असूनही तो पूज्य मानला जातो. चितोडची राजकन्या 'झाली' ही त्याच्या शिष्यगणांपैकी एक शिष्या होती.

**राजमुंदरी** : राजमहेन्द्रवरम् या शब्दाचा अपभ्रंश. गोदावरी नदीच्या डाव्या तीरावर हे शहर वसलेलं आहे. अम्मराजु पहिला, (स. ९२१–९४५) किंवा अम्मराजु दुसरा (स. ९४५–९७०) यांनी त्याची स्थापना केली. पूर्व चालुक्य घराण्यातील राजांची ही राजधानी होती. त्यानंतर कोंडावीडू घराण्याच्या एका शाखेच्या रेड्डी राजाची ती राजधानी झाली. नन्नय्या आणि वीरेशलिंगम् या दोन व्क्तींच्या जीवनाशी या नगरीचा संबंध असल्यामुळं तिला आंध्राच्या वाङमयीन इतिहासात असाधारण महत्त्व आहे.

**राजाजी** : चक्रवर्ती राजगोपालाचारी (जन्म सन १८७९) या नावाचं संक्षिप्त रूप. भारतीय राजकारणातील एक ज्येष्ठ, मुत्सद्दी राजकारणी व महात्मा गांधींचे एक निकटवर्ती मित्र. राजाजी दोनदा मद्रासचे मुख्यमंत्री झाले. त्यानंतर केंन्द्रीय मंत्रीमंडळात ते गृहमंत्री झाले. पुढे ते बंगालचे गव्हर्नर आणि भारताचे गव्हर्नर-जनरल या पदावरही आरूढ झाले. प्रखर बुद्धिमत्ता, हजरजबाबीपणा आणि स्पष्ट, मार्मिक व मर्मभेदक लेखनाबद्दल त्यांची ख्याती आहे. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचा त्याग करून 'स्वतंत्र पार्टी' १९५९ साली त्यांनी स्थापन केली.

**रालापल्ली अनंतकृष्णा शर्मा** : तेलुगु, तामीळ, कन्नड, संस्कृत व पाली या भाषांचे व्यासंगी, विद्वान व संशोधक. त्याशिवाय ते उत्तम गायकही आहेत.

सामाजिक व धार्मिक बाबतीतले त्यांचे विचार जुन्या परंपरेचे असले तरी ते असहिष्णु नाहीत. त्यांचे लेखन स्पष्ट व मर्मभेदी आहे. आंध्र विद्यापीठात त्यांनी वेमनावर एक व्याख्यानमाला गुंफिली. पाली भाषेतून त्यांनी गाथासप्तशतीचं भाषांतर केलं आणि काही उत्तम समीक्षात्मक लेखनही केलं. म्हैसूरच्या महाराजा कॉलिजमध्ये ते तेलुगुचे प्राध्यापक होते. (स. १९१२ ते १९४९) सध्या ते तिरुपती येथे स्थायिक आहेत.

**राम** : भारतीय महाकाव्य रामायणाचा नायक. राजा दशरथ याचा (कौसल्येपासून) ज्येष्ठ पुत्र. विष्णूचा सातवा अवतार. या श्रद्धेनं लक्षावधी हिंदु, रामाची उपासना करतात.

**रामाकवी तुरग** : एक पंडित कवी. रामा कवी चिडला म्हणजे अत्यंत हिडीसपणे वागत असे. निंदा निर्भत्सना करण्याच्या कलेत तो प्रवीण होता. सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात तो होऊन गेला.

**रामानंद** : एफ्. ई. की, यांच्या मतानुसार हा कवी सन १४०० ते १४७० या काळात होऊन गेला असावा. त्याच आधारानं असं सांगता येईल की, या जगाची सूत्रचालक एक आध्यात्मिक व निराकार अशी चिच्छक्ती आहे असं तो मानतो आणि तिला तो राम असं नाव देतो आणि या रामाच्या सगुणभक्तीचा त्यानं प्रसार केला. ईश्वराचं निराकारपण मान्य करूनही हिंदु दैवत-कल्पना किंवा मूर्तिपूजा यांना त्यानं विरोध केला नाही. परंतु त्याचं व्यक्तिमत्त्व इतकं आकर्षक व प्रभावी होतं की शूद्र, जाट, अस्पृश्य आणि मुसलमान विणकर, कबीर आणि स्त्रिया या सर्वांनी त्याचं शिष्यत्त्व स्वीकारलं होतं.

**रामस्वामी कावली वेंकटा (१७६५–१८४०)** : कावली बंधूंपैकी एक. हे सर्व बंधू इंग्रजीतून लेखन करणाऱ्या पहिल्या भारतीय लेखक वर्गांपैकी आहेत. रामस्वामी हा कलकत्त्याच्या पुराणवस्तुसंशोधन खात्यात मुख्य भाषांतरकार, पंडित होता. त्याचं पहिलं पुस्तक ' विश्वगुणदर्शन ' हे वेंकटाचारीच्या संस्कृत प्रबंधाचं भाषांतर आहे. त्यात ऐहिक विश्वातील वस्तुजातीचं वर्णन असून, हा ग्रंथ स. १८२५ मध्ये प्रकाशित करण्यात आला. त्याच्या दुसऱ्या पुस्तकाचं स्वरूप मात्र मौलिक आहे. ' दक्षिणी कवींच्या चरित्ररेखा ' हे पुस्तक १८२९ साली प्रसिद्ध झालं. लेखक म्हणून त्याला त्याच्या

काळात बरीच प्रतिष्ठा प्राप्त झाली असावी. कारण आपली दोन्ही पुस्तकं त्यानं दोन प्रसिद्ध इंग्रज अधिकाऱ्यांना त्यांच्या संमतीने अर्पण केली आहेत. त्यापैकी एक सर एफ्. डब्ल्यू. मॅकनॉटन हे कलकत्त्याच्या सर्वोच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती होते, तर दुसरे लॉर्ड विलियम बेंटिंग हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल होते.

**रामायण** : ' रामाचा वनवास ' असा या शब्दाचा मूळ अर्थ आहे. हिंदूंच्या दोन श्रेष्ठ महाकाव्यांपैकी एक रामायण आहे. दुसरं महाभारत. रामाचा वनवास आणि शेवटी त्याला राज्याभिषेक ही या महाकाव्याची मध्यवर्ती कल्पना. महर्षी वाल्मिकीनं या महाकाव्याची रचना केली असून संस्कृतचा आदिकवी म्हणून त्याचा गौरव केला जातो. याचा रचनाकाल अनिश्चित आहे. परंतु या बाबतीत विंटरनिट्झ यांचं मत असं आहे की, ' रामायण या महाकाव्याचा मुख्य गाभ्याचा भाग ख्रिस्तीसनापूर्वीच्या तिसऱ्या शतकात वाल्मिकीनं रचला असावा, आणि पुढं इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापर्यंत या काव्यात दुसऱ्या अनेक लेखकांनी भर घातली असावी.

**रंभा** : देवांनी आणि दैत्यांनी मिळून अमृतप्राप्तीसाठी जेव्हा समुद्रमंथन केलं तेव्हा त्यातून ही स्वर्गीय सुंदरी बाहेर आली. पृथ्वीवरील तपस्वी मुनींनी आपल्यापेक्षा अधिक पुण्यसंचय करून इंद्रपद बळकावू नये म्हणून त्यांना मोहपाशात गुंतवून त्यांचं अधःपतन घडवून आणण्याच्या उद्देशानं स्वर्गाधीश इंद्र या रंभेला वारंवार पृथ्वीतलावर पाठवीत असे.

**रायलासीमा** : आंध्रातला डोंगराळ प्रदेश. चित्तूर, कडप्पा, कर्नूल आणि अनंतपूर हे चार जिल्हे या भागात मोडतात. हा भाग नेहमी दुष्काळग्रस्त असतो.

**रेड्डी, डॉ. सी. आर. : (१८८०–१९५१)** एक प्रमुख शिक्षणतज्ज्ञ. त्यांनी काही प्रसंगीं राजकारणातही भाग घेतला. ते अनेक वर्षं आंध्र विद्यापीठाचे कुलगुरू होते. अल्पकाळ म्हैसूर विद्यापीठाचे कुलगुरू म्हणूनही त्यांनी काम केलं. हजरजबाबीपणा आणि परिणामकारक प्रत्युत्तरं या गुणांमुळं प्रभावी वक्ते म्हणूनही त्यांना प्रसिद्धी लाभली होती. वाङमयाचे ते एक प्रतिभावान व विख्यात समीक्षक होते.

**लक्ष्मणराव के. व्ही. (१८७७–१९२३)** प्रतिभावान संशोधक व इतिहासकार. तेलुगु गृहविद्यापीठ ग्रंथालय ही संस्था त्यांनी स्थापन केली आणि त्या संस्थेतर्फे साहित्य, चरित्र, इतिहास आणि विज्ञान इ. विषयांवरची उत्तमोत्तम पुस्तकं त्यांनी प्रकाशित केली. तेलुगु भाषेत एक सर्वसमावेशक स्वरूपाचा ज्ञानकोष तयार करण्याची एक योजना आखली होती. परंतु तिसऱ्या खंडाची सिद्धता करीत असताना त्यांना अकाली मरण आलं.

**लक्ष्मीनरसिंहम् चिलकमर्ती : (१८६७–१९४५)** कवी, नाटककार, कादंबरीकार, चरित्रकार, निबंधकार आणि विनोदी लेखक या नात्यानं विविध स्वरूपाचं लेखन त्यांनी केलं आहे. वीरेशलिंगम् यांचे ते अनुयायी होते आणि धार्मिक व सामाजिक सुधारणेच्या कार्यात त्यांनी आपल्या गुरूला साह्य केलं. १९१० साली त्यांना जवळ जवळ अंधत्व आलं तरीही त्यांच्या लेखनाचा प्रवाह शेवटपर्यंत चालू राहिला.

**लालदास :** कबीराच्या उपदेशातून प्रेरणा घेऊन लालदास यांनी लालदासी पंथ स्थापन केला. अलवर हे त्यांचं जन्मस्थान. त्यांचे आई-वडील पशुधनाची चोरी करणाऱ्या मेयो जमातीतले होते. त्याची जन्मतिथी अज्ञात आहे. स. १६४८ मध्ये त्याचा मृत्यू झाला.

**लंका :** रामाची पत्नी सीता हिचं हरण करणाऱ्या रावणाची राजधानी. ती त्याच नावाच्या द्वीपात वसलेली होती. बडोद्याच्या ओरिएंटल इन्स्टिटयूटच्या संशोधकांना लंका म्हणजे आजचे सिलोन हा सिद्धांत अमान्य आहे. रामायणाची नवी निश्चित स्वरूपाची आवृत्ती ते प्रकाशित करणार आहेत.

**लिंगम् :** पुरुषगुह्येंद्रियवाचक संस्कृत शब्द. शैव पंथाचे लोक शिलेपासून तयार केलेल्या शिवलिंगाची पूजा करतात.

**वसिष्ठ :** एक प्राचीन ऋषी. वेद आणि पुराणे यात त्याचा उल्लेख सापडतो. याशिवाय ऋग्वेदात त्यांनी रचलेल्या अनेक ऋचांचा समावेश आहे. धर्मशास्त्राच्या एका ग्रंथाचा तो कर्ता मानला जातो. वैदिक कथेप्रमाणं उर्वशीपासून त्याचा जन्म झाला. मित्रा आणि वरुण या दोन ऋषींनी उर्वशीला एका यज्ञप्रसंगी बघितलं आणि त्यांचं वीर्यस्खलन झालं. त्याचा एक अंश,

जमिनीवर पडला. त्यापासून वसिष्ठ जन्मला. दुसरा भाग एका कुंभात पडला, त्यातून अगस्ती ऋषीचा जन्म झाला.

**वांगुडी सुब्बाराव (१८८६–१९२३)** : लघुउद्योगातले कामगार, व्यापारी म्हणून त्यांनी आपल्या आयुष्यास सुरूवात केली. पण पुढे ते वाङमयसंशोधनाच्या क्षेत्रांत शिरले. वेमनाचं चरित्र, शतककवीवरील प्रबंध आणि तेलुगु साहित्याचा इतिहास हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**विष्णु** : हिंदु दैवतांत विष्णूचे भक्त सर्वांत अधिक आहेत. हिंदु त्रिमूर्तीत विष्णू ही संरक्षण देवता मानली जाते. जेव्हा जेव्हा पृथ्वीवर अनाचार माजतो, तेव्हा तेव्हा धर्माचं व साधूंचं रक्षण करण्यासाठी तो वारंवार अवतार घेऊन पृथ्वीवर येतो. हिंदु पुराणाप्रमाणे आतापर्यंत त्याचे नऊ अवतार झाले असून, कल्कीचा दहावा अवतार होणार आहे.

**वीरशैवपंथ** : बसवानं निर्माण केलेला शिवोपासकांचा लढाऊ पंथ. शिवाला ते सर्वश्रेष्ठ देवता मानतात.

**वीणा** : गिटारसारखे तारांचं बनविलेलं संगीतवाद्य. भारताचं हे फार प्राचीन वाद्य आहे. भारतीय चित्रकलेत, विद्येची देवता आणि ब्रह्मदेवाची मुलगी (पत्नी ?) प्रस्तुत ग्रंथाच्या लेखकाच्या माहितीप्रमाणे) सरस्वती ही नेहमी वीणाधारिणी दाखवली जाते. नारदऋषी हा सरस्वतीचा मुलगा. (?)

**वीरेशलिंगम कंदुकुरी (१८४८–१९१९)** : आधुनिक भारताचा एक सुपुत्र. तो एक थोर धार्मिक व सामाजिक सुधारक होता. विविध स्वरूपात त्यांनी तेलुगु भाषेची सेवा केली आहे. त्या भाषेतली पहिली कादंबरी त्यांनी लिहिली. तेलुगुतलं पहिलं नाटक, पहिली उपहासिका, पहिलं चरित्र आणि पहिलं आत्मचरित्र त्यांनी लिहिलं असून, या वाङमय प्रकाराचे तेलुगुतील ते आद्यलेखक आहेत. साहित्य अकादमीनं ' भारतीय साहित्याचे शिल्पकार ' या मालेत, वीरेशलिंगम्वर एक प्रबंध प्रकाशित केला आहे.

**वेद** : हिंदु धर्माचे अतिप्राचीन आणि प्रमाण धर्मग्रंथ म्हणजे वेद. वैदिक अनुयायांची अशी श्रद्धा आहे की वेद अपौरुषेय आहेत. वेदांची संख्या चार असून ऋग्, यजु :, साम, आणि अथर्व अशी त्यांची नावं आहेत. त्यापैकी ऋग्वेद हा पहिला.

**वेंकटरत्नम (सर) रघुपती : (१८६२–१९३९)** एक प्रमुख शिक्षणतज्ज्ञ, समाजसुधारक आणि धर्मोपदेशक वीरेशलिंगमचे एक तरुण समकालीन. देवदासी, अस्पृश्य आणि समाजातल्या इतर दुबळ्या वर्गांच्या उद्धारासाठी त्यांनी विशेष प्रयत्न केले. पुढे मद्रास विद्यापीठाच्या कुलगुरुचं पद त्यांनी भूषविलं.

**वैश्य** : हिंदु वर्णव्यवस्थेतील तिसऱ्या वर्णाचे लोक. तेलुगु भाषेत त्यांना ' कोमटी ' आणि हिंदीत ' बनिया ' म्हणतात. गांधी जातीनं वाणी होते.

**व्यास** : पराशराची अनौरस संतती. म्हणून त्याला कानीनही म्हणतात. तो एका बेटावर जन्मला. तो वर्णाने काळा होता म्हणून कृष्णद्वैपायन या नावानंही तो ओळखला जातो. त्याची अनक नावं आहेत पण वेदव्यास या नावानं तो अधिक प्रसिद्ध आहे. व्यास या शब्दाचा अर्थ व्यवस्था लावणारा. वेदांची व्यवस्था व संकलन, संपादन त्यांनीच केलं असं मानलं जातं. महाभारत, ब्रह्मसूत्रं आणि अठरा पुराणं यांचाही कर्ता वेद-व्यासच आहे, अशी परंपरागत समजूत आहे.

**शैव** : शिवाच्या उपासकांना शैव म्हणतात. त्यातल्या लढाऊ पंथाला वीरशैव असे नाव आहे.

**शंकर (शंकराचार्य)** : एक प्रमुख तत्त्वज्ञानी. शंकराचार्य हे बहुधा इसवी सनाच्या आठव्या शतकात झाले असावेत. अद्वैत वेदांताच्या सिद्धांताचे प्रवर्तक. त्यांनी स्थापन केलेल्या धर्मपीठातील प्रमुखांना, शंकराचार्य म्हणतात. सध्या पाच मुख्य शंकराचार्यांची पीठं अस्तित्वात असून, त्याशिवाय इतर लहान लहान आचार्यही कामं करीत आहेत. या सर्व आचार्यांपासून त्यांचं स्थान वेगळं आहे हे दर्शविण्यासाठी त्यांना आद्य शंकराचार्य म्हणतात.

**शतक** : एकाच वृत्ताच्या रचलेल्या स्वयंपूर्ण शंभर पद्यांचा संग्रह. शतक-काव्याचं मुख्य लक्षण; वैशिष्ट्य म्हणजे ' मुकुट '. मुकुट म्हणजे पद्याचा शेवटचा शब्द (अथवा ओळ). त्यात कवीचं नाव किंवा त्याच्या आराध्य देवतेचं नाव गुंफलेलं असतं. या ' मुकुटा ' वरून वृत्ताची निवड निश्चित होतं आणि अशा रीतीनं पद्याचा रचनाबंध सिद्ध होतो.

**शिव** : मूलतः ही अनार्य देवता. परंतु हिंदु धर्मात जेव्हा त्रिमूर्तीची कल्पना उदयास आली तेव्हापासून या देवतेला त्यात स्थान प्राप्त झालं. ब्रह्मा ही सर्जनाची देवता. विष्णू ही संरक्षक देवता आणि शिव ही प्रलयाची देवता. या तीन देवतांचा त्रिमूर्तीत समावेश आहे. पण कट्टर शिवोपासक देवांच्या कार्याची ही विभागणीच नाकारतात. शिवापेक्षा विष्णूला जे अधिक महत्त्व दिलं जातं त्यालाही त्यांचा विरोध आहे. त्यांच्या दृष्टीनं शिव ही परमोच्च देवता आहे, त्याच्या शक्तीत त्रिमूर्तीची तिन्ही कार्यं समाविष्ट आहेत. शिव याचा शब्दशः अर्थ 'कल्याण-मय' असाच आहे.

**शिवरात्री** : माघ कृष्ण पक्षातली चौदावी रात्र (फेब्रुवारी–मार्च) शिव-रात्रीच्या दिवशी शिवाचे उपासक दिवसभर उपवास आणि रात्री जागरण करतात.

**श्रीनाथ** (१३६५–१४४०) : डॉन जुआँप्रमाणे मुक्त वृत्तीची विलासी रंगेल व्यक्ती. राजांचा निकटवर्ती, आवडता मित्र आणि कवी. तेलुगु आणि संस्कृत या दोन्ही भाषांवर त्याचं उत्तम प्रभुत्व होतं. थोडे दिवस चमक-दार विलासी जीवन जगून मित्रहीन व दरिद्री अवस्थेत तो मरण पावला.

**श्रीपती (पंडित)** : शैवसंप्रदायावर सर्वप्रथम लिहिणारा ग्रंथकार. 'शिवदीपिका' हा ग्रंथ त्यानं बाराव्या शतकाच्या प्रथमार्धात लिहिला.

**श्रीशैल** : बारा ज्योतिर्लिंगांपैकी एका ज्योतिर्लिंगाचं हे स्थान म्हणून शैवांच्या दृष्टीनं ते महत्त्वाचं व पवित्र तीर्थक्षेत्र गणलं जातं हजारो यात्रेकरू शिवरात्रीला इथं जमतात. या यात्रेकरूंच्या यादीत मराठी राजे छत्रपती श्री शिवाजीमहाराज यांच्या नावाचाही समावेश आहे. त्या ठिकाणी आता मोठा जलविद्युत् प्रकल्प उभारण्यात येत आहे.

**शूद्र** : हिंदु वर्णव्यवस्थेच्या उत्पत्ति-कल्पनेप्रमाणे ब्राह्मण ब्रह्मदेवाच्या मुखातून जन्मले, क्षत्रिय बाहूपासून, वैश्य त्याच्या उदरातून, आणि शूद्र हे पायांपासून उत्पन्न झाले. या कल्पनेनुसार, त्यांच्या नीच जन्मस्थानामुळं त्यांना वर्णजातीव्यवस्थेत शेवटचं, खालचं स्थान मिळालं. आणि अस्पृश्य हे ब्रह्मदेवापासून जन्मलेच नसल्यामुळं त्यांना बहिष्कृत ठरवण्यात आलं.

**सरकार विनयकुमार : (१८८७–१९४९)** अष्टपैलू प्रतिभेचे लेखक. बंगाली आणि इंग्रजी या दोन्ही भाषांतून त्यांनी विपुल आणि प्रतिभासंपन्न लिखाण केलं आहे. अर्थशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ म्हणून त्यांना आंतरराष्ट्रीय कीर्ती प्राप्त झाली आहे. त्यांच्या अनेक ग्रंथांची निरनिराळ्या भाषांत भाषांतरं झाली आहेत. अनेक राष्ट्रांच्या साहित्य संस्थांकडून आणि विविध राष्ट्रांच्या अकादमीतर्फे त्यांना अनेक पदव्या व मानसन्मान प्राप्त झाले आहेत.

**सर्वज्ञ :** त्याचं खरं नाव पुष्पदत्त होतं. ब्राह्मण वडील आणि शूद्र विधवा आई यांच्यापासून त्याचा जन्म झाला. वेमनाच्या आणि त्याच्या उपदेशात पुष्कळ साम्य आहे. इ. पी. राईस यांनी त्याचा काळ सोळावं शतक धरला आहे. पण तो अद्याप अनिश्चित आहे.

**स्मिथ व्हिन्सेंट : (१८४८–१९०२)** भारतीय सनदी अधिकारी. (सन १८७१ मध्ये सेवेत प्रवेश) आणि जवळ जवळ अर्धे शतक त्यांनी भारतीय इतिहास आणि संस्कृती या क्षेत्रात कार्य केलं. त्याच्या महत्त्वाच्या कृतीत, 'अशोकाचं संपूर्ण चरित्र', 'भारताचा प्राचीन इतिहास', (१९०४) 'भारत आणि सिलोन या देशातील कलेचा इतिहास' हे तीन ग्रंथ प्रमुख आहेत. 'ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया' हा १९१८ साली प्रसिद्ध झालेला आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ.

**सोमनाथ : पालकुरिकी** तेलुगु आणि कन्नड या दोन्ही भाषांतून विपुल लेखन करणारे एक ग्रंथकार. वीरशैव पंथाचे ते एक उत्साही कार्यकर्तेही होते. बसवपुराणाखेरीज 'पंडिताराध्य चरित्र' आणि 'अनुभवसार' हे त्यांचे दोन प्रमुख ग्रंथ आहेत. बसवाचे ते शिष्य होते.

**हेमचंद्र : (१०८८–११७२)** अनेकशास्त्रकलाकोविद जैन पंडित. कवी, इतिहासकार तर ते होतेच, पण त्याशिवाय काव्यशास्त्र आणि इतर अनेक विषयांवर त्यांनी संस्कृत व प्राकृत या दोन्हीं भाषांतून अनेक प्रबंध लिहिले आहेत.

**हिंदी :** भारत देशात बहुसंख्य जनतेकडून बोलली जाणारी भाषा. संविधानात भारतीय संघराज्याच्या सरकारी कामकाजाची भाषा म्हणूनही तिला मान्यता देण्यात आली आहे.

**क्षीरसागर** : दुग्धसमुद्र. हिंदु पुराणकथेत सात समुद्रांचे वर्णन आहे. खाऱ्या पाण्याचा, शुद्ध पाण्याचा, दुधाचा, दह्याचा, तुपाचा, ऊसाच्या रसाचा (मधाचा) आणि मद्याचा असे सात समुद्र आहेत असा पुराणात उल्लेख आहे.

**ज्ञानदेव** (१२७५–१२९६) : महाराष्ट्राचे पहिले आणि अग्रगण्य संत. ते सर्वश्रेष्ठ कवीही होते. त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले असून भगवद्गीतेवरील भाष्य-ग्रंथ ज्ञानेश्वरी हा त्यांचा सर्वांत प्रसिद्ध व महत्त्वाचा ग्रंथ होय.

———